खंड
पाच



## महेश्वर दरबारचीं

# बातमीपत्रें


संपादक

दत्तात्रय बळवंत पारसनीस

सुधारित आवृत्तीचे संपादक

डॉ. देवीदास पोटे








महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

**खंड पांच**

‘इतिहाससंग्रहा’त प्रसिद्ध झालेलीं

# महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें

**संपादक**

**दत्तात्रय बळवंत पारसनीस**

संपादक, ‘इतिहाससंग्रह’

सातारा

**दुसऱ्या सुधारित आवृत्तीचे संपादक**

**डॉ. देवीदास पोटे**



**महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ**

मुंबई

➢ **पुस्तकाचे नाव** : महेश्वर दरबारची बातमीपत्रें : खंड पाच

Maheshwar Darbarchi Batamipatre
Volume-Five

➢ **पहिल्या आवृत्तीचे संपादक** : दत्तात्रय बळवंत पारसनीस

➢ **दुसऱ्या सुधारित आवृत्तीचे संपादक** : डॉ. देवीदास पोटे

➢ **प्रथमावृत्ती** : १९१०-१९११ (भाग १ आणि भाग २)

➢ **दुसरी सुधारित आवृत्ती** : २०२१ (दोन्ही भाग एकत्र)

➢ **प्रकाशक** :

सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ
रवींद्र नाट्यमंदिर इमारत, दुसरा मजला,
पु. ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी आवार,
सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई ४०० ०२५.



➢ **मुखपृष्ठ** : सतीश भावसार

➢ **मुद्रक** :

व्यवस्थापक,
शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय,
मुंबई ४०० ००४.

➢ **किंमत** : रुपये ६२४/-

# अध्यक्षांचे मनोगत

छत्रपती शिवरायांनी हिंदवी स्वराज्याचे तोरण उभारले. लोककल्याणाचा आदर्श घालून दिलेल्या या राजाच्या लढवय्या शिलेदार-मावळ्यांनी पुढे अटकेपार स्वराज्याचा विस्तार केला. त्यात होते महाराजांचे मराठी सरदार शिंदे, घोरपडे, निंबाळकर, दाभाडे, गायकवाड आणि इंदूरचे होळकर. या होळकरशाहीचा इतिहास हा आधुनिक भारताच्या इतिहासातील एक महत्त्वाचा कालखंड होता. होळकर रियासत ही अखिल मराठेशाहीचे एक महत्त्वाचे अंग आणि आधारस्तंभ होती. होळकरशाहीत मल्हारराव होळकर आणि अहिल्याबाई होळकर यांचे कार्य ऐतिहासिक महत्त्वाचे आहे. त्यात अहिल्याबाईंचा शासनकाळ हा तर होळकरशाहीचा सुवर्णकाळच मानला जातो.

सर्वसामान्य कुटुंबात जन्मलेल्या अहिल्याबाई एका वैभवशाली होळकर राज्याच्या स्वामिनी बनल्या. त्या शूर लढवय्या, चांगल्या रणनीतिज्ञ आणि न्यायी वृत्तीच्या होत्या. त्यांच्या जीवनात आलेली अनेक संकटे, दुःखाला त्यांना सामोरे जावे लागले; पण प्रजेच्या कल्याणात आणि सेवेतच आपला मोक्ष आहे, हे ओळखून त्यांनी आयुष्यभर जनहिताची असंख्य कामे केली. अन्यायाची त्यांना चीड होती. त्यांनी धर्माचरण आणि राजकारणाची सुयोग्य सांगड घातली. कर्तव्यनिष्ठा, धर्मनिरपेक्षता आणि सात्त्विकता या गुणवैशिष्ट्यांमुळे त्या केवळ राजमाता न राहता पुण्यश्लोक लोकमाता ठरल्या. अत्यंत साधे निर्मळ जीवन आणि पराकोटीचे दातृत्व ही त्यांची जगावेगळी ओळख होती. काश्मीर ते कन्याकुमारी अन् द्वारका ते पूर्वेकडच्या देशभरातील अनेक मंदिरे, तीर्थस्थळे, नदीकाठ, धर्मशाळा, पिण्याच्या पाण्याचे हौद, विहीरी-बारवा त्यांनी बांधल्या, जगावेगळ्या दानशूरत्वाने देशभरात आपला कायमस्वरूपांचा ठसा उमटविणाऱ्या त्या एकमेव महाराणी आहेत. या देशात अनेक

राजे-रजवाड्यांनी आपापल्या राज्यात लोकोपयोगी कामे केली आहेत, हा इतिहास आहे; पण स्वत:च्या राज्याबाहेर देशभर जनसेवेची पाणपोई उभारणाऱ्या एकमेव अहिल्याबाईच होत्या. हिंदुस्थानच्या अनेक राजघराण्याच्या इतिहासात जनकल्याणाची कामे केल्याचा इतिहास बघायला मिळतो; पण आपल्या राज्याबाहेर सर्व जाती-धर्माच्या स्थळांच्या जीर्णोद्धारासाठी मदत केलेल्या अहिल्याबाईच दिसून येतात.

इंदूरच्या होळकर घराण्याचे मल्हारराव होळकर संस्थापक होते. त्यानंतर अहिल्याबाईंचा सुवर्णकाळ येतो. त्यांच्यानंतर यशवंतराव होळकरांनी हा वारसा सांभाळला. इ. स. १६९३ पासूनचा हा दोनशे वर्षांचा इतिहास आहे. भारताच्या इतिहासातील होळकरशाहीचा इतिहास हा आपला एक सांस्कृतिक वारसा आहे. तो एकत्रित स्वरूपात पुनर्प्रकाशित करावा यासाठी आमचे मित्र डॉ. देवीदास पोटे हे प्रयत्न करत आहेत, ही गोष्ट माहीत असल्याने हे काम करण्याची संधी महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळास द्या, अशी विनंती मी त्यांना केली. आणि त्यांनी ती स्वीकारून 'होळकरशाहीचा समग्र इतिहास' या प्रकल्पासाठी रात्रंदिवस झोकून देऊन काम केले. माणसाने ठरविले आणि नियोजनपूर्वक ध्यास घेतला की, ते काम वेळीच पूर्ण होऊ शकते, हा अनुभव डॉ. देवीदास पोटे यांच्या कामातून दिसून आला. केवळ दीड वर्षात एकहाती दहा खंड करणे, हे अवघड नाही, हे त्यांनी या दहा खंडातील सुमारे पाच हजार पानांच्या बृहद प्रकल्पाच्या उदाहरणातून दाखवून दिले आहे.

या समग्र इतिहासाचे प्रकाशन साहित्य आणि संस्कृती मंडळाचा अध्यक्ष म्हणून माझ्या काळात होत असलेले दुसरे महत्त्वाचे काम आहे. असेच पहिले मोठे काम म्हणजे महाराष्ट्राचे वाङ्मयमहर्षी गुरुवर्य कृष्णराव अर्जुन केळूसकर यांचे बारा खंड तयार झाले आहेत. 'होळकरशाहीचा समग्र इतिहास' या प्रकल्पात पूर्वप्रकाशित खंडांचे लेखक तसेच प्रशासक आणि दूरदृष्टी असलेल्या दानशूर अहिल्याबाईंच्या अनोख्या पर्वाची ओळख सर्वांना होणार आहे.

इ.स. १८१८ ला मराठेशाहीचा अस्त होऊन हिंदुस्थानवर ब्रिटिश सत्तेचा अंमल सुरू झाला. एक दोन सार्वभौम संस्थानिक वगळता बहुतांश सगळे संस्थानिक ब्रिटिश सार्वभौम सत्तेचे मांडलिक होते. या मांडलिकांकडे ब्रिटिश सरकारचा प्रतिनिधी म्हणून रेसिडेंटची नियुक्ती केली जाई. संस्थानिकांवर नियंत्रण ठेवण्याचे एक प्रकारचे त्याचे काम असे. याच प्रकारे उत्तर पेशवाईत मराठा सरदारांवर नियंत्रण ठेवण्यासाठी नाना फडणवीस यांनी पेशव्यांच्या वतीने वेगवेगळ्या सरदारांकडे आपले वकील नेमले. दरबारात नेमलेल्या वकिलाने संबंधित सरदार-संस्थानाच्या कामकाजांचे, घडामोडींचे, राजकीय निर्णय यासंबंधीचे अहवाल पेशव्यांना पाठविण्याचे काम केले होते. हे अहवाल म्हणजे एक प्रकारचे रिपोर्टस् आहेत, असे म्हणता येईल.

नाना फडणवीस यांची होळकर दरबारात विठ्ठल शामराज व केसो भिकाजी दातार

यांना वकील म्हणून नेमले. यातील विठ्ठल शामराज यांनी इ.स.१७७९ ते १७८३ पर्यंत आणि केसो भिकाजी दातारांनी इ.स.१७८४ ते १७९६ पर्यंत काम केले. या पेशव्यांच्या दोन्ही वकिलांचे होळकर दरबारातील अहवाल म्हणजे 'महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें' आहेत. सातारा येथील इतिहास संशोधक श्री. दत्तात्रय बळवंत पारसनीस यांनी महेश्वरच्या होळकर दरबारातील वकिलांचे अहवाल मिळवले. सातारा येथील 'इतिहास संग्रह' मासिकात त्यांनी ती प्रथम प्रकाशित केली. श्री पारसनीस यांनी प्रयत्नपूर्वक हे संशोधन केले. पेशव्यांच्या वकिलांनी ही बातमीपत्रे पाठवताना काही वेळेस एकांगी पद्धतीने लिहिली आहेत, असे दिसून येते. इ.स. १९१० व १९११ साली इंदूरहून ती दोन भागात ग्रंथरूपाने प्रकाशित झाली. हा इतिहासाचा अनमोल वारसा एकशे सात वर्षांनी पुन्हा प्रकाशित करण्याची संधी महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळास मिळत आहे, याचा आम्हाला आनंद आहे. ही बातमीपत्रे मिळवून संपादनाचे काम केलेले द. ब. पारसनीस, या प्रकल्पांचे संपादक डॉ. देवीदास पोटे आणि त्यांना मदत करणाऱ्या सर्वांचे या निमित्ताने आभार.

**बाबा भांड**
अध्यक्ष
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,
मुंबई

मुंबई, दि. १० ऑगस्ट २०१८

# प्रस्तावना

महेश्वर दरबारची बातमीपत्रे म्हणजे नाना फडणवीस यांनी पेशव्यांच्या वतीने महेश्वर दरबारात नियुक्त केलेले वकील विठ्ठल शामराज (इ. स. १७७९ ते १७८३) आणि केसो भिकाजी दातार (इ. स. १७८४ ते १७९६) यांनी पाठविलेली बातमीपत्रे. होळकर दरबारचे कामकाज, घडामोडी, भेटीगाठी, बैठका, सैन्याच्या हालचाली, राजकीय निर्णय, सण, उत्सव आदी विषयांबाबतचा अहवाल पेशव्यांना पाठविणे हे त्यांचे काम होते. आधुनिक भाषेत त्यांना रिपोर्ताज वा रिपोर्टस् (Reports) असे म्हणतात.

ही बातमीपत्रे इ. स. १७७९ ते १७९६ या कालावधीतील आहेत. यातील लेखांक अहिल्याबाईंच्या कारकीर्दीतील आहेत. फक्त शेवटचे तीन लेखांक, क्र. ३९९ (ता. २.१०.१७९५), ४०० (ता. ९.१२.१७९५), आणि ४०१ (ता. ३१.१.१७९६) हे अहिल्याबाईंच्या कारकीर्दीनंतरचे आहेत. थोर इतिहास संशोधक श्री. दत्तात्रय बळवंत पारसनीस (इ. स. १८७०-१९२६) यांनी ही कागदपत्रें पहिल्यांदा 'इतिहास संग्रह' या मासिकात सातारा येथून प्रसिद्ध केली.

विसाव्या शतकात महाराष्ट्रात इतिहास संशोधनाच्या कामात ज्या इतिहासकारांनी मोलाची भर घातली त्यातील काशिनाथ नारायण साने, वासुदेवशास्त्री खरे, इतिहासाचार्य विश्वनाथ काशिनाथ राजवाडे आणि दत्तात्रय बळवंत पारसनीस ही चार महत्त्वाची नावे आहेत. महाराष्ट्रात इतिहासलेखनासाठी अस्सल साधने संग्रहीत करणे, ती जतन करणे यासारखे पायाभूत मौलिक काम त्यांनी केले. इतिहाससंशोधन आणि इतिहासलेखनाला चालना देणारे हे चार आधारस्तंभ आहेत. (संदर्भ : मराठ्यांचे इतिहासकार - अ. वा. कुलकर्णी, डायमंड पब्लिकेशन्स, पुणे)

इंग्रज राजवटीत सी. ए. किंकेड (इ. स. १८७०-१९५४) हे एक प्रशासकीय अधिकारी होते. त्यांच्या सरकारी कारकीर्दीतील बराचसा काळ महाराष्ट्रात गेल्यामुळे त्यांना मराठ्यांच्या इतिहासाबाबत कुतूहल निर्माण झाले होते. 'ग्रँड डफ'ने लिहिलेल्या 'मराठ्यांचा इतिहास' या ग्रंथाबाबत त्यांचे मत अनुकूल नव्हते. म्हणूनच आपल्या प्रशासकीय अनुभवाच्या आधारे मराठ्यांचा इतिहास पुन्हा लिहावा असे त्यांना तीव्रतेने वाटले. याच काळात रावबहाद्दुर द. ब. पारसनीस यांच्याशी त्यांचा संबंध आला. पारसनीस यांनी अनेक मराठी कागदपत्रे जमविली आणि त्या कागदपत्रांचे इंग्रजी भाषांतर करवून ती किंकेड यांस पाठविली. इतिहासलेखनाचे हे काम दोघांच्या सहयोगाने अकरा वर्षात पूर्ण झाले. हा इतिहास पुस्तकरूपाने तीन खंडात प्रसिद्ध झाला. (इ. स. १९१८-१९२५)

महेश्वर दरबारच्या बातमीपत्राबाबतची कागदपत्रे पारसनीस यांनी कशी मिळविली याबाबतची हकीकत 'मराठ्यांचे इतिहासकार' या ग्रंथात दिली आहे.

''मराठ्यांचा इतिहासकार ग्रँट डफ म्हणतो, 'मराठा राष्ट्राने निर्माण केलेला नाना फडणीस हा शेवटचा कुशाग्र बुद्धीचा, तेजस्वी मुत्सद्दी होय.' या नाना फडणीसाचा खाजगी पत्रव्यवहार, सातारा जिल्ह्यातील, वाई तालुक्यातील कृष्णा नदीच्या तीरावरील मेणवली या गावी होता. नाना फडणीसावर शेवटच्या पेशव्याची, दुसऱ्या बाजीरावांची गैरमर्जी झाल्याने त्याला कारभारीपदावरून दूर केले होते. नानाच्या जेव्हा ते लक्षात आले तेव्हा त्याने आपला महत्त्वाचा राजकीय पत्रव्यवहार 'मेणवली' या आपल्या गावी नेला होता. परंतु, १८०० साली त्याचा मृत्यू झाला आणि त्याच्या वारसदारांनी त्याकडे पूर्ण दुर्लक्ष केले. पारसनीस यांना या 'मेणवली' दफ्तराची आणि त्यातील महत्त्वपूर्ण ऐतिहासिक कागदपत्रांची पूर्वकल्पना होती. त्यामुळे युक्तिप्रयुक्तीने विविध मार्गांचा अवलंब करून त्यांनी ते सारे दफ्तर हस्तगत केले आणि नानाच्या वंशजांनी त्याची विल्हेवाट लावण्यापूर्वी आणि त्या दफ्तराचा संपूर्ण नाश होण्यापूर्वी ते सुरक्षितपणे जतन करून ठेवले. या संग्रहातून महत्त्वाचे दस्तऐवज निवडून त्यांनी ते आपल्या 'इतिहाससंग्रहातून' क्रमशः प्रसिद्ध करण्यास प्रारंभ केला.''

(संदर्भ : मराठ्यांचे इतिहासकार - अ. रा. कुलकर्णी
डायमंड पब्लिकेशन्स, पुणे, २०११, पृ. १९४)

होळकरशाहीतील मंत्री, कारभारी यांचे अहिल्याबाईंच्या राज्यकारभारात महत्त्वाचे योगदान आहे. मात्र केसो भिकाजीचे या कारभाऱ्यांविषयीचे मत चांगले नाही. आपल्या बातमीपत्रात एके ठिकाणी त्याने लिहिलंय,

''मुत्सद्दी आहेत त्यांचा प्रकार पूर्वी लिहिला असे. त्यास दौलतीचा प्रकार अगत्यवाद नाहीं. त्यांची तपश्चर्या उत्तम. ह्यांस काडीइतकी चिंता नाहीं. तिसरा प्रहरां दरबारांत यावे. चार घटका बसून घरास जावें. याप्रमाणें नित्याची वर्तणूक आहे.''

(महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें, लेखांक २४४,
दि. २४ फेब्रुवारी १७८६, पृ. २९६)

आपल्या कारभाऱ्यांपासून दरबाराची आणि राज्यव्यवहारासंबंधीची कामे कशी करून घ्यावीत याचे परिपूर्ण ज्ञान अहिल्याबाईंना होते. होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें (संपादक : वा. वा. ठाकूर) यातील पत्रव्यवहार, आदेश, विविध प्रकरणातील निर्णय यावरून त्यांचे प्रशासनकौशल्य, प्रशासनावरील पकड या बाबींचा प्रत्यय येतो. यात दरबारातील कारभारी, कमाविसदार, सैन्याधिकारी, या सर्वांचे मोठे योगदान आहे. त्यामुळे कारभाऱ्यांच्या विषयी ''तिसरा प्रहरां दरबारांत यावें, चार घटका बसून घरास जावें'' हे वकिलांचे निरीक्षण वस्तुस्थितीचा विपर्यास करणारे आहे.

बातमीपत्रे लिहिताना काही प्रसंगी केसो भिकाजी यांचा तोल ढळलेला दिसतो. एका बाजूला अहिल्याबाईंचा राज्यकारभार आदर्श असल्याचे प्रमाणपत्र विदेशी सत्तेचा प्रतिनिधी, मध्य प्रांताचा गव्हर्नर सर जॉन मालकम, मोरोपंत, अनंतफंदी, आदी महनीय व्यक्ती देतात तर दुसरीकडे पेशव्यांचा वकील अहिल्याबाईंच्या वा होळकरशाहीच्या काभाराविषयी लिहितो,

''हे होळीचे होळकर ! त्यास दवलत राहिली अथवा न राहिली ही काळजी नाहीं. आज चार वर्षे यथास्थित पाहत आहे. होळकरांची दवलत चालावी असें येथें माणूस मातब्बर कोणी नाहीं.''

(महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें, लेखांक २४२, दि. ४ फेब्रुवारी १७८६, पृ. २९५)

यावरून बातमीपत्रे लिहितांना वकिलाच्या ठायी जो तटस्थपणा आणि समतोलपणा असणे आवश्यक आहे, त्यांचा येथे पूर्ण अभाव दिसतो. या वर्णनातून वकिलाची पूर्वग्रहदूषित दृष्टी आणि एकांगी विचारसरणी याचा प्रत्यय येतो.

अहिल्याबाईंचे चरित्रकार विश्वनाथ नारायण देव यांनीही महेश्वर दरबारच्या बातमीपत्राबाबत आपल्या चरित्रग्रंथाच्या प्रस्तावनेत लिहिले आहे. ते म्हणतात,

''विठ्ठल शामराज याचा पक्षाभिमान सोडला तर ही पत्रें फारच मार्मिक असून त्यात बारीकसारीक गोष्टी दिल्या आहेत. त्यांची वर्णन करण्याची हातोटी चांगली असून पत्रें रसभरित आहेत. हा लेखक धोरणी व दूरदृष्टीचा आहे.''

(देवी श्रीअहिल्याबाई होळकर हिचे चरित्र, १९३३, पृ. २३)

पेशव्यांचा वकील विठ्ठल शामराज याच्या बाबतीत वकिलांना हवी असलेली तटस्थ वृत्ती, समतोल दृष्टी या गोष्टींचा अभाव 'पक्षाभिमान' या शब्दातून यथार्थपणे व्यक्त होतो.

पेशव्यांचा वकील टिपूसारख्या परकीय शत्रूंच्या उपद्रवाबाबत कांहीं ठोस लष्करी वा मुत्सद्देगिरीचा उपाय सुचविण्याऐवजी दृष्टांत आणि मारूतीची उपासना यावर विसंबून रहातो, हे वास्तव चिंताजनक आहे.

''टिपूची दाटी ऐकून बहुत चिंता प्राप्त झाली. त्यावरून श्री मारूतीची सेवा शरीरेंकरून करविली. यशाशक्ति नित्य ब्राम्हणभोजन करविलें. त्यास श्रींचा साक्षात्कार झाला कीं, पौष वद्य २ सोमवारपासून दिवस ४१ पावेतों टिपूचा उत्कर्ष पुढें, एकेचाळीस ४१ दिवस

गेल्यानंतर त्याचा उपमर्द होऊन सरकारचा प्रताप अधिकोत्तर होईल, याप्रमाणे दृष्टांत जाला. पूर्वी राजश्री मोरोबादादा व होळकर पुरंदरास आले, ते समयीं मी याप्रमाणें श्रीमारूतीची सेवा केली. ते वेळेस याप्रमाणें दृष्टांत कीं, अकरा दिवसपावेतों श्रम आपणास होतील, पुढें अधिकोत्तर यशप्राप्ति घडेल. हे वर्तमान राजमान श्री. मल्हारपंत भडभडे यांस व कैलासवासी देशमुख यास पुरतेपणें सांगितले होते. त्याचा अनुभव श्रीने घडविला. त्याउपरी फिरंगी व कैलासवासी दादासाहेब आले, ते समयीं संकट जाणून श्रीमारुतीची सेवा लष्करांत केली. तेव्हां दृष्टांत, १८ दिवसांनंतर यशप्राप्ति. त्याप्रमाणें अनुभव आला. सांप्रत हे संकट प्राप्त ! देशींहून वर्तमान येऊं लागले कीं, टिपूची दाटी फार, त्यावरून चिंता प्राप्त जाहली. सर्वस्वे श्रीमंतांचे दौलतीचे बोझे सर्व स्वामींकडे. त्यावरून श्रींची प्रार्थना बहुत केली. त्यावरून ४१ एकेचाळीस दिवसांनंतर सरकारचा उत्कर्ष बहुत होईल, याचा अनुभव श्रीप्रतापें घडेल. चिंता नाही. पूर्वी दोन्हीं दृष्टांत अनुभवास आले, त्याचा संकल्प व हल्लीं श्रींचा संकल्प केला तो सिद्धीस न्यावयाची विनंति समक्ष आल्यावर करीन. पूर्वीचा संकल्प देशमुखास सांगितलें होतें. श्रीकृपेकरून सरकारचा नक्ष व महाराजांस यशप्राप्ति व्हावी हेच निरंतर इच्छा व प्रार्थना श्रीमारुतीजवळ करीत आहे.''

(महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें, लेखांक २४०,
दि. १७ जानेवारी १७८६, पृ. २९३-२९४)

पेशव्यांनी आपले वकील होळकर दरबारात नेमले होते. त्यामुळे त्यांचे वेतन आदी खर्च पेशवे दरबाराने करणे हे अपेक्षित होते. आपल्या सेवकांना, वकिलांना वा फौजेतील सैनिकांना वेळच्या वेळी वेतन देणे हा राज्यकारभाराचा महत्त्वाचा भाग आहे. शिवाजी महाराजांची शिवशाही आणि अहिल्याबाईंची होळकरशाही या याबाबतीतील आदर्श उदाहरणे आहेत. मात्र विठ्ठल शामराज वा केसो भिकाजी दातार यांच्या बातमीपत्रात पैशाच्या अडचणीविषयी पेशव्यांना वारंवार लिहिले आहे.

आपल्या आर्थिक व अडचणीविषयी वकिलांच्या बातमीपत्रांत सतत उल्लेख येतात. उदा.

''सेवकाची खर्चाची विपत्ती फार आहे. अडीचशें रुपये लोकांचे देणें झालें आहे. पुढें खर्चास पाहिजे.''

(लेखांक २०, दि. १५ आक्टोबर १७८०, पृ. ३७)

''सेवकास खर्चास नाही. कर्ज तीनशें रुपये झालें. स्वामींनीं खर्चास पाठविलें, त्यास नऊ महिने झाले. धनी कृपाळू समर्थ.''

(लेखांक २२, दि. २८ आक्टोबर १७८०, पृ. ४०)

''येथें देणेदारांचा उपद्रव व खर्चाची तसदी कितीक सोसावी? येथें मेलें तर कोणी समाचार घेणार नाही. त्यास धन्यांच्या पायांचाच आश्रय. येथें देण्याच्या व खर्चाच्या

उपद्रवामुळें फार श्रमात आहे. येथील उपेक्षा कशी आहे ते काय लिहूं ?'' पांचशें रुपये लोकांचे देणे जाले आहे. पुढें नित्य खर्च लागलाच आहे.

(लेखांक ४३, दि. १९ मार्च १७८१, पृ. ९०)

''सेवकाची खर्चाची फार विपत्य आहे. पांच सहाशें रुपये कर्जही जालें आहे. तेथें कांहीं उपाय नाही. धनी कृपाळू समर्थ.''

(लेखांक ६६, दि. १२ डिसेंबर १७८१, पृ. १२७)

''सेवकाची खर्चाची विपत्य फार आहे. देणें लोकांचे फार जाले. त्यांचा उपद्रव निराळा. पोटास नाही ती विपत्य वारंवार दर पत्रीं विनंति लिहितो. मी आणिक कोणास लिहूं ?''

(लेखांक ८६, दि. २ मार्च १७८३, पृ. १५६)

''बहुत दिवस जाले, येथील देणें वारत नाही. पुढें ज्याचें घेतले तो कांहीं देत नाही. सर्वस्वे चिंता! याचे निवारण खावंदांखेरीज कोण करितो?''

(लेखांक २७८, दि. ८ सप्टेंबर १७८७, पृ. ३२३)

''येथील खर्चाविषयीं विनंति पूर्वी लिहिलीच आहे. त्याविषयीं आज्ञा जाली नाहीं. बहुत दिवस जाले, परामर्श जाला नाहीं. येथें कर्जही कोणी देत नाही. उपाय काय करावा? आजपावेतों राजश्री कृष्णाजी नाईक थत्ते यांचा ऐवज, असाम्याकडे होता तो घेत गेलों, त्यांचाही तगादा आहे. नित्य कृत्याचें चाललें पाहिजे. अडचण जाणोन विनंति लिहिली आहे. बाईकडून आमचेविषयीं नामकरण नाही. यंदा सर्वत्रांची समजावीस जाली, परंतु इकडल्याविषयीं अनुकूल पडले नाहीं.''

(लेखांक ३३४, दि. १५ आक्टोबर १७९०, पृ. ३७०)

स्त्रीस्वभावाचे गुणधर्म सांगून अहिल्याबाईंचे उणेपण दाखविण्याचा प्रयत्न केसो भिकाजी दातार या वकिलाने केला आहे. तो म्हणतो,

''समज नाही. जें एक चित्तांत भरलें, तें जात नाहीं. आधीच स्त्रियांचीं चित्तें बद्धमुष्टिवत् अलंकारीं सांगितली. त्या बद्धमुष्टिचित्ताचे निवृत्त पदार्थ आहेत. ते आवस्थात्रय प्रकारें आहेत. ही आवस्थात्रयातीत जाली, यामुळें साधन घडत नाही. खावंद-मसलतीचे लौकिक अर्थ तें ध्यानांत येत नाही. मसलतगार मातबर माणूस लौकिकाचा असाही कोणी जवळ नाही. जें करावे तें आपण आपले मतें करीत असावे. मग बिघडो अथवा सुधारो ही तऱ्हा आहे.''

(लेखांक १३१, इ. स. १७८२, पृ. २१३)

अहिल्याबाईंच्या अस्तित्वात नसलेल्या तथाकथित उण्या बाजू दाखविण्याचा त्याने चंगच बांधलेला दिसतो.

''तिजला मोठा गर्व कीं, मी शहाणी व सुभेदारामागें एकनिष्ठ, अथवा दौलत केली ती मीं केली व दानधर्म आचरण तें माझे, हा अभिमान. आचरण दाखवितां लौकिकीं

फार चांगलें दाखवितात. अंतर शुद्ध नाही.''

(लेखांक १३४, दि. १ जानेवारी १७८३, पृ. २१५)

''बाईंची दूरआंदेशी व समज पोख्त हे स्वामी लिहितात, तें खरें. ती समज येथें दिसत नाहीं.''

(लेखांक १३८, दि. १८ फेब्रुवारी १७८३, पृ. २१७)

''वरकड विस्तार बोलावा, तर येथील बहुनायकी. बाईची अखत्यारी कोणावर नाही. बाईस तर कृत्रिम कळत नाहीं.''

(लेखांक १६२, दि. २६ मे १७८३, पृ. २३६-२३७)

''तर साल आइदेचे ऐवजीं तुकोजीबावांचें पत्र आणा म्हणजे देईन असे दिक्कती सांगतात. आमचा यत्न तितका भय प्रीत दाखवून, युक्तीचे वाटें बोलणें ते बोलून पाहिलें. त्यास समजतच नाहीं. चार कारभारी आहेत. त्यांसीं सांगांवे तर ते बाईपेक्षां गोष्टी सांगतात. त्यांसही आगापिछा नाही.''

(लेखांक १५७, दि. १९ मे १७८३, पृ. २३२)

''तेथें कोणी मनावर घेऊन छान करीत नाही. अंधेर! दोन प्रहर मुख्यासुद्धां व कारभारी सहमंडळी कारभार होतच नाहीं. त्यानंतर निद्रा! तृतीय प्रहरांनंतर चार घटका दरबार! त्यांत दादी फिर्यादी, आले गेले! याप्रमाणें नित्य अभ्यास आहे. दौलतींत उणें अधिक पाहणारा कोणी नाही. अवघे सांगकामे आहेत. नेकीबंदीस बाईच आहेत.''

(लेखांक २८९, दि. १५ आगस्ट, इ. स. १७८८, पृ. ३३१-३३२)

असे उल्लेख विठ्ठल शामराज आणि केसो भिकाजी दातार यांच्या अनेक पत्रांत आलेले आहेत.

पुरुषोत्तम यांच्या अहिल्याचरित्रावर चिंतामण विनायक वैद्य यांचा दीर्घ निबंध १९३० मध्ये 'विविध ज्ञान विस्तार' मध्ये प्रकाशित झाला होता. त्यात त्यांनी पेशव्यांच्या वकिलाच्या अहिल्याबाईंविषयी निंदाजनक लिखाणाची दखल घेऊन वकिलांस अयोग्य टीका केल्याबद्दल फटकारले आहे. वकिलाचे वाक्य असे -

''सांप्रत बाईस अराणूक यात्रेची रवानगी व दानधर्माचा विनियोग, या हर्षामुळें क्षणभर अवकाश नाहीं.''

(लेखांक २६५, दि. २४ जानेवारी, इ. स. १७८७, पृ. ३१४)

यावर भाष्य करताना चिं. वि. वैद्य म्हणतात,

''धर्मासंबंधीं कामात दुसऱ्यांची हरएक तऱ्हेनें मदत करताना व दानधर्म करिताना ज्या धन्य व्यक्तीस आनंदाच्या उकळ्या येतात असा खरा धर्मात्मा प्राणी या पृथ्वीतलावर विरळा होय! मात्र हे त्या कुटिल व्यवहारांत दंग झालेल्या कारकुनास कळले नाहीं.''

(पुरुषोत्तमकृत 'अहिल्याबाईंचे चरित्र' यावरील चिं. वि. वैद्य यांचा निबंध, १९३०, पृ. ५४)

श्री. चिं. वि. वैद्य यांचे हे भाष्य बोलके असून वकिलाच्या एकांगीपणावर नेमकेपणाने बोट ठेवणारे आहे.

होळकर दरबारात इतर अनेक राज्यांचेही वकील होते. त्यांच्या वेतनाच्या बाबतीत कुठलाही प्रश्न उद्भवल्याचे आढळत नाही. मात्र पेशव्यांच्या वकिलांना सतत आर्थिक चणचणीत रहावे लागणे ही बाब योग्य नव्हती. वकिलांना सावकारी कर्ज घेऊन आपली गुजराण करावी लागणे हे संबंधित प्रशासनाच्या दृष्टीने कुठल्याही प्रकारे समर्थनीय वाटत नाही.

ही बातमीपत्रे निरपेक्ष बुद्धीने लिहिलेली नसून अनेक ठिकाणी एकांगी पद्धतीने लिहिलेली समीक्षापत्रे आहेत असे वाटते. बातमीपत्रात घटना वा घडामोडी म्हणजे News येणे अपेक्षित असते. वैयक्तिक मते वा Views नव्हे.

बातमीपत्रातील या काही उण्या बाजू आहेत. मात्र ही बातमीपत्रे ऐतिहासिक दृष्ट्या अतिशय महत्त्वाची आहेत. अनेक राजकीय घडामोडी, विविध शत्रूंशी झालेली युद्धे, विविध प्रकरणातील प्रशासकीय निर्णय, लग्नप्रसंगीची पट्टी, जासूदांच्या हालचाली, अहिल्याबाईंचा दानधर्म, विविध लोककल्याणकारी कामे, शिंदे-होळकर, पेशवे-होळकर यांच्या परस्परसंबंधातील संदर्भ अशा अनेक प्रकारे मराठेशाहीच्या आणि होळकरशाहीच्या इतिहासाचा एक पट आपल्या नजरेसमोर येतो.

इतिहासाचा अभ्यास वा लेखन करताना पत्रव्यवहार, सनदा, रोजकीर्द, आदेश, नाणी, शिक्के याप्रमाणे बातमीपत्रे हा एक महत्त्वाचा दस्तऐवज मानला जातो. म्हणूनच होळकरशाहीचा आणि विशेषतः अहिल्याबाईंच्या प्रशासनाचा आणि राज्यकारभाराचा अभ्यास करताना या बातमीपत्रातील अनेक सदंर्भांचा आपल्याला निश्चितपणे उपयोग होतो. यादृष्टीने ही बातमीपत्रे ऐतिहासिक दृष्ट्या अतिशय महत्त्वाची आहेत, हे निर्विवाद आहे.

ही बातमीपत्रे इ. स. १९१० आणि इ. स. १९११ या वर्षांत प्रकाशित झालेली आहेत. म्हणजे एक शतकाहून अधिक काळ उलटून गेला आहे. हे ग्रंथ अनेक वर्षे दुर्मीळ होते. १०७ वर्षांनंतर या ग्रंथांची आवृत्ती पुन्हा प्रकाशित होत आहे. यामुळे इतिहास संशोधक, अभ्यासक आणि रसिक वाचक यांची मोठी सोय होईल असे निश्चितपणे वाटते.

या बातमीपत्रांतून तत्कालीन मराठी भाषेचे अनेक पैलू दिसून येतात. आंग, हांगामे, कही काबाड, रस्त, गिराणी, वरतावा, हलकाई, नालीश, दुराख, खमीर, कावित्र, खलेल, धरणीपारणी, तकारनामका, घटवटना, तडन, पुस्तपन्हाई, क्षित, कुन्हा, जथ, तसलमात, पेशअंदेशी, इस्तकबील, वस्तवाणी, बमय, तष्ट यांसारखे शब्दप्रयोग हे तत्कालीन भाषेचे विशेष रूप आहे, याचा प्रत्यय येतो. 'सल्ला' हा शब्द वेगवेगळ्या वेळी कधी पुल्लिंगी म्हणजे 'सल्ला दिला' तर कधी स्त्रीलिंगी म्हणजे 'सल्ला दिली' अशा दोन्ही पद्धतीने वापरलेला दिसतो.

सोयीकरिता बातमीपत्रांचे दोन्ही भाग एकत्र करून लेखांक सलग घेतले आहेत.

यामुळे ग्रंथवाचनात आणि अध्ययनात सुलभता येईल. मूळ ग्रंथातील भाग १ मधील शेवटचा लेखांक (नं. १२५) ता. ४ मार्च इ. स. १७८४ चा आहे आणि दुसऱ्या भागातील पहिला लेखांक (नं. १) दि. १९ आक्टोबर इ. स. १७८२ चा आहे. हा अनुक्रम मूळ ग्रंथाबरहुकूम घेतला आहे. ग्रंथाची भाषा जुन्या वळणाची असून त्यावर हिंदीचा प्रभाव आहे. इतर भाषांमधील अनेक शब्द आले आहेत. आकलनाच्या दृष्टीने सुलभ व्हावे म्हणून ग्रंथाच्या शेवटी परिशिष्टे, शब्दार्थ/टीपा आदी दिले असून ते अभ्यासकांना निश्चितपणे उपयुक्त ठरतील असा विश्वास वाटतो.

या ग्रंथाच्या निर्मितीसाठी अनेक इतिहास संशोधक, अभ्यासक, रसिक आणि सुहृद यांचे बहुमोल सहाय्य झाले.

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाचे अध्यक्ष श्री. बाबा भांड यांनी होळकरशाहीच्या समग्र इतिहासाचा प्रकल्प संपादनासाठी माझ्याकडे सोपविला त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. या ग्रंथांचे आवश्यक त्या ठिकाणी संपादन करून हे काम विहित कालवधीत पूर्ण करता आले याबाबत समाधान वाटते. या कामी अनेक नामवंत इतिहासकार, अभ्यासक, रसिक आणि सुहृद यांचे अनेक परींचे सहकार्य लाभले, हे कृतज्ञतापूर्वक नमूद करावेसे वाटते.

मा. जयसिंगराव पवार (कोल्हापूर), प्रा. सु. प्र. कुलकर्णी, डॉ. लीला गोविलकर (अहमदनगर), प्रा. ना. ग. काळे, राजेंद्र लाळगे, सुनील मतकर, सुभाष वाघमारे, विठ्ठलराव गांवडे (इंदूर), वसंत महेश्वरकर (महेश्वर), रामभाऊ लांडे (अंबड, जि. जालना), बाळकृष्ण शंकर तथा अण्णासाहेब वारे, डॉ. सुधीर तारे, डॉ. दिलीप बलसेकर, रवीन्द्र लाड, प्रतापराव पाटील, मुकुंद सराफ (मुंबई), डॉ. अरुणचंद्र पाठक, डॉ. गिरीश मांडके (पुणे) यांचे अनमोल सहकार्य लाभले. या सर्वांचे मनःपूर्वक आभार.

पहिल्या आवृत्तीचे प्रकाशक तुकाराम जावजी आणि डायमंड पब्लिकेशन्स (पुणे) यांचेही मनःपूत आभार.

ज्येष्ठ साहित्यिक, इतिहासकार आणि अखिल भारतीय संमेलनाचे माजी अध्यक्ष डॉ. सदानंद मोरे यांच्याबरोबर वेळोवेळी झालेल्या चर्चेचा या ग्रंथाच्या संपादन कार्यात विशेष उपयोग झाला हे कृतज्ञतापूर्वक नमूद करणे आवश्यक आहे. त्यांचे मन:पूर्वक आभार.

या ग्रंथाची ही सुधारित आवृत्ती इतिहासकार, अभ्यासक आणि रसिक वाचक यांच्या पसंतीस उतरेल, असा विश्वास वाटतो.

**डॉ. देवीदास पोटे**

मुंबई, दि. ३१ जुलै २०१८ — संपादक

# मूळ संपादकाची प्रस्तावना : ‘उपोद्धात’

इंदूर येथील होळकरांच्या घराण्यांतील इतिहासप्रसिद्ध सद्गुणी व राज्यकर्त्री स्त्री राणी अहल्याबाई हिचें नांव अखिल भरतखंडामध्ये दुमदुमत आहे, ह्या लोकोत्तर स्त्रीचें साधार व सविस्तर असें चरित्र आजपर्यंत प्रसिद्ध झालेलें नाहीं. परंतु सांप्रत महाराष्ट्राच्या इतिहासाचीं जीं नवीन साधनें सुदैवानें उपलब्ध होत आहेत, त्यांवरून ह्या स्त्रीचें सुरस व मनोरम चरित्र जगापुढे लवकरच येईल अशी आशा करण्यास हरकत नाहीं. अहल्याबाईच्या चरित्राचें सत्य स्वरूप किती अपूर्व, हृदयंगम व उज्ज्वल आहे व त्यात किती इतिहासरस भरलेला आहे, ह्याचें निराळें वर्णन करण्याचें हें स्थल नाहीं. ह्या संबंधानें ‘विविधज्ञानविस्तार’ चरित्राचें सत्य स्वरूप व त्यांतील कांहीं मनोरंजक मासले’’ ह्या निबंधामध्यें बरीच चर्चा केलेली आहे. त्यावरून जिज्ञासु वाचकांस त्याची अल्पशी तरी कल्पना करितां येईल. तथापि ह्या चरित्रास साधनीभूत होणारा जो पत्रव्यवहार आह्मांस राजकार्यधुरंधर सुप्रसिद्ध महाराष्ट्रमुत्सद्दी नाना फडणवीस ह्यांच्या मेणवली येथील दप्तरामध्यें उपलब्ध झाला आहे, त्यावरून अहल्याबाईच्या चरित्राचें सत्य स्वरूप व त्याचें खरें अंतरंग स्पष्ट रीतीनें नेत्रांसमोर आल्यावांचून राहणार नाहीं. हा पत्रव्यवहार पत्रशः संपूर्ण मिळालेला नाहीं; तथापि तो जितका उपलब्ध झाला आहे, तितकाही चरित्राच्या मर्यादित अवकाशामध्ये समाविष्ट होण्यासारखा नसून, फार विस्तृत व तत्कालीन बहुविध राजकारणांनीं युक्त असा आहे. त्याचे स्वतंत्र दोन भाग करून ते मराठ्यांच्या इतिहाससाधनांत अंतर्भूत करावेत ह्या हेतूनें, तो क्रमशः ‘इतिहाससंग्रह’द्वारा प्रसिद्ध करण्याचें योजिलें आहे.

२. अहल्याबाईच्या महेश्वर येथील दरबारीं, पेशव्यांच्या तर्फेने, नाना फडणविसांनीं दोन वकील केले होते. त्यांचीं नांवें अनुक्रमें विठ्ठल शामराज व केसो भिकाजी अशीं

होतीं. त्यांनीं महेश्वर येथून बाईच्या दिनचर्येचीं व राजकारणांची इत्थंभूत बातमीपत्रें पुण्यास पाठविण्याचा क्रम ठेविला होता. हे वकील अनुक्रमें इ. स. १७७९ पासून इ. स. १७८३, व इ.स. १७८४ पासून इ.स.१७९४ पर्यंत महेश्वर दरबारीं होते. ह्या दोन वकिलांच्या बातमीपत्रांमध्यें अहल्याबाईची दिनचर्या, तिचा दरबार, तिचे मुत्सद्दी (=मुत्सद्दीपण), तिचीं पेशव्यांशीं व इतर मराठे सरदारांशीं झालेलीं राजकारणें, वगैरे गोष्टी, उत्तम प्रकारें नमूद आहेतच; परंतु त्या वेळच्या मराठ्यांच्या एकंदर राजकरणांचाही त्यांत चांगल्या रीतीनें निर्देश असून, मराठ्यांच्या इतिहासावर त्यांचा सर्व बाजूंनीं उत्तम प्रकाश पडण्यासारखा आहे. त्याचप्रमाणें तत्कालीन भाषा, चालीरीति, वगैरे गोष्टींचेंही त्यावरून चांगलें दिग्दर्शन होण्यासारखें आहे. ह्याकरितां हीं पत्रें इ.स. १७८० पासून इ.स. १७८३ पर्यंत एक खंड, व इ.स.१७८४ पासून इ.स.१७९४ पर्यंत एक खंड, अशीं खंडशः प्रसिद्ध करण्यांत येतील.

३. पहिल्या खंडांत विठ्ठल शामराज ह्यांचीं बातमीपत्रें येतील. हा विठ्ठल शामराज मराठ्यांच्या इतिहासांत फारसा कोठें प्रसिद्ध नाहीं. त्याचें उपनांव व राहण्याचें ठिकाण समजत नाहीं, तथापि हा मनुष्य फार जिज्ञासु, चिकित्सक, बहुश्रुत व मार्मिक दिसतो. हा हरिपंत फडके ह्यांच्या वशिल्यानें उदयास येऊन मराठ्यांच्या लष्करांत प्रथमतः बातम्या पाठविण्याचे कामावर लहानशा कारकुनी पेशानें नौकर असावा असें दिसतें. त्याची बुद्धिमत्ता व शोधकता पाहून, नाना फडणविसांनीं त्याची योजना महेश्वर दरबारामध्यें इ. स. १७७९ मध्यें केली. ता. २७ मे इ.स.१७७९ रोजीं, त्यानें पिंपरखेडनजीक नसरतपूर खोजाचें ह्या गांवाहून जें पत्र लिहिलें आहे, त्यावरून तो नुकताच, नाना फडणविसांस सासवड मुक्कामीं भेटून, त्यांच्या आज्ञेनें श्रीमंत राघोबादादा पेशवे ह्यांच्या लष्करांत हरी बाबाजी ह्यांच्या गोटांत आला होता असें दिसतें. हें पत्र येणेंप्रमाणें :-

''सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत चंद्र २१ रबिलावलपर्यंत पिंपळपरखेड नजीक नसरतपूर खोजाचें येथें वर्तमान यथास्थित असे विशेष. सासवडचे मुक्कामींहून स्वामींची आज्ञा घेऊन स्वार झालों, ते छ १८ मिनहूस नातेगांव वाकळ्यांचे मुक्कामीं श्रीमंत राजश्री दादासाहेबांचे सैन्यांत राजश्री हरी बाबाजी याच्या गोटांत दाखल झालो. हरिपंतांची भेट घेतली. सरकारचें व राजश्री पाटिलबाबांचें पत्रें दिलीं व मशारनिल्हेकडेस गांव आहे त्याविषयी स्वामींनीं यांस पत्रें दिलीं होतीं तींही दिलीं. पाहून बहुत संतोष झाले, 'मी विनंति केली होती, त्याप्रमाणेंच श्रीमंतांनीं कृपा करून गांव आह्मांकडे बहाल ठेवला' असें ह्मणाले. वरकड कित्येक वचनोक्ती हैदरनाईक वगैरे यांजकडील वर्तमान आज्ञापिलें, तें सविस्तर मशारनिल्हेस सेवकानें विदित केलें. सांप्रत येथें यांची चौकशी फार आहे. नेहमी एक कारकून रात्रंदिवस श्रीमंतांच्या डेऱ्यांत यांनीं बसविला आहे. कोण येणार कोण जाणार तितका इतल्ला यांस आहे. श्रीमंतांची मर्जी रक्षून, त्यांचे खर्चवेचाची सरबराई करून,

अंतरगत फार बारकाव्यानें चौकशी यथास्थित करितात. प्रस्तुत श्रीमंतांस आज तीन चार दिवस सावकाश नाहीं. पडसें वगैरे व ज्वराचा उपद्रव झाला आहे. दोन चार दिवस स्नान करीत नाहींत. यास्तव तीन मुक्काम नातेगांव वांकळ्यावर आंबराईंत झाले. त्या मुक्कामावर पाण्याचा तोटा फारच झाला. परंतु श्रीमंतांस बेआराम ह्मणून मुक्काम झाले. पाण्याकरितांच काल चंद्र २० मिनहूस प्रातःकालीं कूच करून कासारबारीचा घांट उतरून दीड प्रहर दिवसां या मुक्कामीं दाखल झाले. या मुक्कामीं झाडें सावलीस कांहीं नाहींत. परंतु पाणी ओढा वाहत आहे. येथें कांही मुक्काम होतील असें बोलतात. सबब कीं, श्रीमंतांस कांहीं आरामही झाला पाहिजे, व मागाहून दादासाहेबांचा कांहीं पैठणींहून खजानाही येणार, त्याचीही मार्गप्रतीक्षा आहे. आरोग्य झालें ह्मणजे दरमजल चलावें, ऐवजासाठीं बारीचे तोंडीं कांहीं शेंपन्नास स्वार ठेवावे, अशीही बोलवा आहे. मुलकी वर्तमान, जे वाटेनें जातात ते आसपास चिठ्या पाठवून जमीदारांस बोलावून आणून घांस लकडी व शाकभाजी वगैरे सरंजाम मागवून श्रीमंतांकडे पावितात. कमाविसदारांनीं आपलाले तालुक्यांचा सरंजाम मार्गावर आणून पोंहचवावा हा पथ सरकारचा आहे. त्याप्रमाणेंच तालुकदारांजवळून आणवितात. ताकीदार जागांजागां पाठवून रखवाल्याही करितात. ताकीद फार निक्षून आहे. जें दृष्टीस पडलें व कानीं ऐकिलें तें रुबरू आणून, त्याची यथास्थित चौकशी करून शिक्षा करितात. सांप्रत येथें फौजेचा भरणा दादासाहेबांची खासगत कमकसर दोनशें स्वार, पागा व एकांडे मिळून व पायदळ गाडदी वगैरे हजार बाराशें, व तोफा, याशिवाय शिंद्याची चार पांच हजार फौज व होळकराकडील दोनशें स्वार ऐसे आहेत. पांचा हजारांचे भरतीस शिंद्याकडील आणीकही फौज येणार. सांप्रत या प्रकारचें वर्तमान आहे. श्रीमंतांस जो पदार्थ पाहिजे तो हरिपंतांकडेस त्यांनीं सांगून पाठवावें. यांनीं त्यांचे मर्जीप्रमाणें सरबराई करून द्यावी असें आहे. या लष्करबाजारांत धारणः-ज्वारी बाजरी नऊ साडेनऊ पायली, गहूं नऊ दहा पायली, हरभरे आठ नऊ पायली, डाळ तुरीची अकरा शेर, तांदूळ कंपेश आठ नऊ दहा शेर, गूळ आठ शेर, मीठ चार पायली, तूप अडीच शेर, खुर्दा शिवराई चार टक्के, पक्का दोन टक्के, याप्रमाणें आज आहे. मीं श्रीमंतांचे दरबारास जावें कीं तिकडे आसपास फिरावें ह्मटलें, त्यास हरिपंत ह्मणाले जे तुह्मीं गेल्यानें सारे तिन्ही दरबारचे तुमचे ओळखी. श्रीमंतांच्या चित्तांत कीं जवळले लोक विपर्यास घालतील, त्यांची बेमर्जी होईल, ठीक पडणार नाहीं. तुझी आह्मांजवळीच असून आह्मांस पुसत जावें. देखाल ऐकाल तें श्रीमंतांस लिहित जा. याप्रमाणें यांनीं सांगितलें. असा येथें आहें. जशी आज्ञा येईल तशी वर्तणूक करीन. उष्णकाळ फार आहे. सावलीस कांहीं नाहीं. बेसरंजामी, धन्यास सर्व विदित आहे. स्वामी कृपाळू समर्थ हे विज्ञप्ति.''

ह्या पत्रावरून विठ्ठल शामराज हा, पुणें दरबाराच्या माहितीचा असून, दादासाहेबांच्या लष्करांत बातमी आणण्यासाठींच, नाना फडणविसांकडून रवाना झाला होता असें दिसतें. ह्या वेळीं त्याची कायमची नेमणूक झाल्याचें दिसत नाहीं. परंतु

राजकारणप्रसंगानें त्यास लवकरच नाना फडणविसांनीं महेश्वर येथें अहल्याबाईच्या दरबारीं वकिलीस पाठविलें असावें असें उघड होतें. तेथें तो पावसाळा लागण्यापूर्वीच पोहोंचला. त्यानें महेश्वर येथून पाठविलेलें ता. १० जून इ. स. १७७९ चें पत्र उपलब्ध झालें आहे, त्यावरून तो नर्मदातटाकीं महेश्वरक्षेत्रीं ह्याच सुमारास पोहोंचला असावा हें सिद्ध होतें.

विठ्ठल शामराज ह्याचीं इ. स. १७७९ सालचीं महेश्वर येथून पाठविलेलीं अवघीं दोनच पत्रें उपलब्ध झालीं आहेत. ह्या सालची बाकीचीं पत्रें गहाळ झालीं कीं काय तें समजत नाहीं! इ.स.१७८० पासून इ.स. १७८४ पर्यंतचीं पत्रें बहुतेक शाबूत आहेत. बहुतेक ह्मणण्याचें कारण त्यांतील पत्रेंही मधून मधून गहाळ झालेलीं आहेत!! तीं बहुधा कसरीच्या भक्षस्थानीं पडलीं असावींत, असें सांपडलेल्या कागदांच्या शोचनीय स्थितीवरून मानण्यास हरकत नाहीं! सद्भाग्य एवढेंच कीं, इतका तरी हा मूल्यवान् पत्रव्यवहार आज महाराष्ट्राच्या इतिहासाच्या पुनरुज्जीवनार्थ उपलब्ध झाला!! हा पत्रव्यवहार किती महत्त्वाचा आहे व त्यांतील प्रत्येक पत्र देखील किती वाचनीय व मनोरंजक आहे हें जाणण्याचें काम वाचकांकडे आहे.

विठ्ठल शामराज ह्याचीं माहिती व ह्या पहिल्या भागाची प्रस्तावना हा सर्व छापल्यानंतर प्रसिद्ध करण्यांत येईल. तोंपर्यंत कोणी इतिहासप्रिय व रसिक गृहस्थांनीं ह्या विषयासंबंधानें अधिक माहिती अथवा कागदपत्र मिळवून देण्याचें श्रेय घेतलें, तर त्यांची आमच्यावर फार मेहेरबानी होईल ह्या पत्रव्यवहाराच्या प्रसिद्धीनें आणखी ऐतिहासिक कागदपत्रांचा अधिक सुगावा लागेल व ते जगापुढें येतील तर आमच्या श्रमांचें पुष्कळ अंशीं सार्थक झालें असें मानण्यांत येईल.

**– द. ब. पारसनीस**

# अनुक्रमणिका

‘इतिहाससंग्रहां’त प्रसिद्ध झालेलीं

# महेश्वरदरबारचीं बातमीपत्रें.

[कारकीर्द–अहल्याबाई होळकर.]

## भाग १ ला.



**दत्तात्रय बळवंत पारसनीस**

संपादक, ‘इतिहाससंग्रह’

सातारा.



मुंबई येथें,

‘निर्णयसागर’ छापखान्यांत तुकाराम जावजी

ह्यांनीं छापून प्रसिद्ध केला.

नं. २३ कोलभाट लेन.

इ. स. १९१०.

किंमत २ रुपये.

‘इतिहाससंग्रहां’त प्रसिद्ध झालेलीं

# महेश्वरदरबारचीं बातमीपत्रें.

[कारकीर्द–अहल्याबाई होळकर.]

## भाग २ रा.




**दत्तात्रय बळवंत पारसनीस**

संपादक, ‘इतिहाससंग्रह’

सातारा.





मुंबई येथें,

‘निर्णयसागर’ छापखान्यांत तुकाराम जावजी

ह्यांनीं छापून प्रसिद्ध केला.

नं. २३ कोलभाट लेन.

इ. स. १९११.

किंमत २ रुपये.

# भाग पहिला

## लेखांक १

पै।। चंद्र ५
जमादिलाखर समानीन

**श्री गजानन**

ता. १० जून, इ. स. १७७९
मि. ज्येष्ठ व।। ११, शके १७०१

''सेवेसीं विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ २४ जमादिलावल परियंत मुक्काम महेश्वर येथें स्वामींच्या कृपावलोकनें करून वर्तमान यथास्थित असे विशेष. येथील वर्तमानें पेशजीं विनंतिपत्रीं लिहून छ २२ मिनहूस रवाना केली, तें सेवेसीं पावलीं असतील. सांप्रत श्रीमंत दादासाहेबांचे वर्तमान : मुंबईस जाऊन मोर्चे दिले आहेत म्हणून बाजारी वर्तमान ऐकिलें व इंग्रजांकडे नारो तुकदेव गेले होते, तेही इंग्रजांनीं धिक्कारून माघारीं पाठविले जे, 'आम्हांस तुमचा भरंवसा येत नाहीं. तळेगांवावर आमची खराबी करून तुम्ही शिंदे होळकरांसीं मिळून त्याजकडेस निघून गेलां. असे बेइमान. तुमच्या वचनेंत दृढतरता नाही. इतके दिवसही तुमचे शब्दीं लागून कर्जदार जालों. पेशजीं तुम्हास रुपया दिला आहे, तो अद्याप वसूल झाला नाहीं. पुढें तुम्हांस खांद्यावर घेऊन आपले पदरानशीं खराब व्हावें, आपल्याशीं वैर करावे, (तर) आमचेही चार जागे लहानथोर त्याच्या इजनांत आहेत. त्यांनीही फराशीसांचें साधन केले आहे. लढाई भिडाईंत खराबी झाली तर आमची होईल. तुम्हांजवळ तर ना फौज ना खर्चास ! तुम्हांस पदरचे खर्चास देऊंन, शेवटीं, समयास त्यासीं सास्त बांधून निघून जावें. आम्हीं खराब व्हावें हें आम्हांस अनुकूळ पडत नाहीं. तुम्ही कोणतेही गोष्टीस साबूत नाहीत. तळेगांवावर जख बसतां आम्हांवर बसली. तुम्ही साबूत निघून गेलेत, तें ईर्षा आम्हांस येऊन प्राप्त

---

(इ. स. १७७९ सालची बातमीपत्रें अवघीं दोनच उपलब्ध झालीं आहेत. त्यांमध्यें मुख्यत्वेंकरून मराठे व इंग्रज ह्यांच्यामधील पहिल्या लढाईच्या सुमाराचें रघुनाथरावदादा पेशवे ह्यांच्या हालचालीचे वर्तमान आहे.)

झाली आहे. असो. आमचे काबूस येईल ते समयीं आम्ही पाहून घेऊं. परंतु तुमची सोबत आम्हांस नको !' असें जाबसाल होऊन नारो तुकदेव माघारीं आले. आतां राजाराम गोविंद, सौभाग्यवती मातुश्रीबाईंची पत्रें इमानपुरस्कर घेऊन, अमृतरायांस घेऊन इंग्रजांकडे जाणार. तोंवर श्रीमंत मुंबईस आहेत. हे इतके वर्तमान इंदूरच्या साहुकाराचा गुमास्तां नानकजीनामें बऱ्हाणपुरास गेला, तेथून औरंगाबादेस जाणार, त्यानें हें वर्तमान सांगितलें. सत्य मिथ्या देव जाणे. इकडील फौजांचे वर्तमान पाटीलबावांकडील देवजी गौळी आपले लोकांनशीं जमून बऱ्हानपुराचे रोखें जाऊन, तापीचे पाण्यानें सुलतानपूर नंदुरबारेवरून सोनगडचे रोखें जावे असा निश्चय केला. मातुश्री अहिल्याबाईंवर खर्चाची वरात पाटीलबावांनीं पंचवीस हजारांची पाठविली. तो ऐवज बाईंनीं उज्जनीस हुंड्या दिल्या आहेत. ऐवज आला म्हणजे फौजेस वांटून जावें तों येसोबा बक्षी शिंद्याकडील हरी बाबाजी सांगाते होते, ते धुलकोटावरून उज्जनीस गेलों होतों तेथें त्याचें कुटुंब आहे म्हणून गेले होते. मागें हरी बाबाजीचें असें जालें. ते आतां महेश्वरास आले. त्यांनीं देवजी गौळी यांजकडे जाऊन उभयतांनीं मसलत केली जे, सोनगडाकडेस गेले तर नीट फिरंग्याच्या तोंडावरच जाणें लागतें. झुंज फौजेनें सुद्धां परिणाम लागणार नाहीं. यास्तव इकडून झाबव्याच्या घाटें, भिलाड्यांतून नीट पावागडच्या रोखें जावे; तालुकाहीं शिंद्यांचाच आहे; तेथें जावून पावागडाजवळ छावणी करावी. म्हणजे दादासाहेब आपल्या तालुक्यांत धामधूमही करणार नाहीत. त्यांजवर दबावही पडेल. अशी मसलत उभयतांनीं करून, देवजी गौळी फौजसुद्धां बऱ्हाणपुरचा रोंख सोडून अलीकडे आले. त्यास होळकर आपल्या तालुक्यांत कही काबाड करूं देत नाहीत; यास्तव सरकार तालुक्याचे पांच सात गांव येथें कोठें आहेत तेथें कही काबाड करून आहेत. उज्जनीचा ऐवज आला म्हणजे तयारी करून जावें असें आहे. होळकरांकडीलही लोकांचीही तयारी बाई करितात. राजश्री रंगराव महादेवराव व खंडेराव त्रिंबक यांचेहीं काल दर्शन झालें. येथें बाईंनीं बोलाविलें. सरकारचीं पत्रेंही त्यांस दाखविलीं. कितीक प्रकारें त्यांनीं सरकारकार्याची भाषणें केलीं. पाहतां त्यांचा कांहीं सरकारकामाविशीं अनमान दिसून आला नाहीं. स्वामीकार्यास सादरच आहेत. परंतु कांहीं तरी एक मुक्त सर असावा; त्याजदेखत कामकाज कोणाचें कसें होतें, हें त्यांच्या निदर्शनास यावें; असे त्यांचें मानस. परंतु शिंदे होळकरांच्या फौजा तयार होऊन चालल्या म्हणजे हेही तयार होऊन चालतील. सांप्रत वोढेकराचे खराबीचा प्रकार व सांप्रत सरंजाम जप्त झाला आहे व गुदस्तां पैवस्तां यांनीं सौभाग्यवती मातुश्री आनंदीबाईंची चाकरी कोणत्या रीतीनें केली, हें परभारा मातुश्री अहिल्याबाईंनींच सविस्तर सांगतिलें. खंडेराव त्रिंबक इतकेंच बोलले जे, श्रीमंत धनी आहेत, जे आबरु त्यांनीं दिली आहे, ते जतन करायाचें त्यांचेच हाती आहे. सर्वजण समर्थ आहेत. इतकें मात्र बोलले. येथील प्रकार असा झाला आहे. दोन्हीं तिन्हीं पथके श्रीमंतांच्या पिच्छ्यास होतीं. त्यांत चाकऱ्या सर्वत्रांच्याच झाल्या. परंतु दादासाहेब निघून गेले आणि हीं पथके माघारीं आलीं हें सर्वांस कळलें. परंतु आपला आपला उत्कर्ष असा शब्द आला नाहीं. जें होणें तें धन्याचे पुण्येंकडून होईल असें बोलतात; परभारे सेवकांच्या ऐकिण्यांतही

वोढेकराची चाकरी सर्वांपेक्षां अधिक झाली; परंतु सर्वांची एकदिलता असावी, म्हणजे कामें होतात. सांप्रत हे लोक बाहेर निघून तिकडे दादासाहेबांच्या पिच्छ्यास जायास कांहीं दिवस लागतील असें दिसतें. दुसरी बोलवा आहे कीं, श्रीमंत दादासाहेबांस प्रस्तुत खायास नाहीं. इंग्रजाची दादासाहेबांशीं चित्तशुद्धता होई, तोंवर माळवे प्रांतीं व गुजराथ प्रांतीं धामधूम करून, चार पैसे मेळवावे असें करतीलसें दिसते. बोलवाही अशीच आहे. बाजारी वर्तमान कीं; दादासाहेबांनीं हैदर नाईकास लिहून पाठविलें जे, आपण असा उत्कर्ष करून निघून गेलों. तुम्हीं जमियत पोख्त करून, कृष्णातीरपर्यंत ठाणीं बसवीत तिकडून येणें. तुम्ही बरोबरीने त्यांस पायबंद देणें व भोंसल्याकडेस हीं पत्रें गेलीं जे, मुधोजी भोसल्याचा मधला पुत्र चिमणराजा त्यास पांच सात हजार फौजेनशीं पाठवून देणें म्हणून पत्रें दादासाहेबांचीं गेलीं. हें बाजारी वर्तमान ऐकिलें. आपल्याकडील वर्तमान ऐकिलें जे, उभयतां सरदार कूच करून गंगेपरियंत आले. इकडे दरमजल येणार. वोढेकराविशीं धन्याची कृपादृष्टी असावी. धन्याची मर्जी, ह्या फौजा बाहेर निघाल्यावर यांजबरोबर मीं जावें. परंतु वर्तमान बातमीचीं पत्रें कोणाबरोबर पाठवूं ? होळकर तेथून निघाले असले तर त्यांची डाकही उठत येईल. मजजवळ तर माणूस एक नाही. इकडेच जासूद अगर कासीद नवे ठेवायची आज्ञा झाली तर तसें करीन. तोंवर तों स्वामींनीं डाकेची अगर जासूद व कासीद इकडे पाठवावयाची तरतूद केलीच असेल. लवकर व्हावी. जासूद सेवकाजवळ येत, तोवर महेश्वरीं राहूं कीं फौजेबरोबर जाऊं? यांसही निघायास आणखी आठ चार दिवस लागतील. तोंवर काय ते आज्ञाही येईल. देखलें ऐकिलें वर्तमान सेवेसीं श्रुत होय हे विज्ञप्ति.''

---

## लेखांक २

| | | |
|---|---|---|
| पै।। चंद्र ७ रमजान<br>समानीन भाद्रपद मास | **श्री गजानन** | ता. ७ सप्टेंबर, इ. स. १७७९<br>मि. श्रावण व।। १२, शके १७०१ |

''सेवेसीं विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना ता.चंद्र २५ साबानपर्यंत मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे विशेष. येथील वर्तमान व श्रीमंत दादासाहेबांकडील वर्तमान कळलें, ते चंद्र १७ मिनहूस आपले कासीद जोडीबरोबर लिहून, सरकाराची कासीद जोडीबरोबर रवाना सेवेसीं केलीं आहेत; व त्यावर कळलें वर्तमान ते चंद्र २१ मिनहूस डाकेबरोबर रवाना केली आहेत. सेवेसीं पावली असतील. सांप्रतचें वर्तमान : राजश्री बापूजी होळकर इंदुरीं दाखल झाले. श्रीमंत राजश्री दादासाहेबांकडून केसोपंत नामें सरदार त्याजबरोबर हजार फौज देऊन इकडे रवाना केले. त्यास मशारनिल्हे फौज घेऊन नवापुरधायट्यास आले. नवापुरा लुटला. तेथें ठाणें ठेवून पुढें दहिवलीला आले. तीही लुटली. तेथेंही ठाणें ठेवून पुढें भांबर परगण्यांत दांतर दिसेवाली म्हणून गांव आहे, तेथें दोनतीन घरें

कोकणस्थांचीं होतीं. त्यांस त्या गांवीं केसोपंत जाऊन, ते गृहस्थ धरून, त्यांची घरे लुटून त्या गृहस्थास कैद करून, कांहीं दंड मागतात. तेथून केसोपंतांनीं पांचशें स्वार गुलजारखानाकडेस पाठविले. कोंडाईबारीस दोन पलटणें ठेऊन घांट बंद केला. मागाहून आणिक दोन हजार फौज व चार पलटणें घेऊन राजाराम गोविंद ये प्रांतीं येणार इकडून गुलजारखानही त्यास सामील होणार. या प्रकारचे वर्तमान ऐकिलें. तें काल चंद्र २४ मिनहूस पत्रें लिहून, कासीदजोडी राजश्री विसाजी बापूजी, सरकारची फौज घेऊन आले आहेत, त्यांजकडेही रवाना केलें. परंतु ते कोठें आहेत हें वर्तमान कांहीं कळत नाहीं. त्यांनीं एक वेळ मजकडे पत्र पाठविलें होतें. त्यावर वर्तमान कांहीं कळत नाहीं. कासीदास कोठें भेटतील ते भेटोत. त्या कासीद जोडीबरोबर सरकारचींही पत्रें आहेत. मग कासीद सेवेसीं येवोत अगर विसाजीपंत आपले जोडीबरोबर पाठवोत. इकडे गडबड होयास करिती. आपलें कोणी इकडे नाही. गुलजारखानही दादासाहेबांकडेस जाईलसें दिसते. देखिलें ऐकिलें वर्तमान सेवेसीं श्रुत होय. सेवकाकडेस तीन कासीद जोड्या पाठविल्या आहेत, त्यांपैकीं एक सत्तावीस तारखेस पाठविली, एक काल पाठविली. कासीदास रोजमुरा लवकर पाहिजे तरी इकडे बिदा होय तर बरें आहे. धन्याची मर्जी. हे विज्ञप्ति.''

---

## लेखांक ३

**श्री गजानन** ता. २५ फेब्रुवारी, इ. स. १७८०
मि. माघ व।। ६, शके १७०१

श्रीमंत राजश्री नानासाहेब :

''नवीन वर्तमान : राजश्री तुकोजी होळकर यांनी अहिल्याबाईंस चंद्र ९ सफरचें पत्र लिहिलें होते, ते कोंडाईबारी उतरून ते मुक्कामाचें होतें. त्यात मजकूर जे : सरंजामी लोक व पेंढारी ऐसे रवाना करून इकडे पाठवावें. त्यावरून बाईंनीं पेंढारी सात आठ हजार जागां जागां सरंजामी लोक आहेत ते ऐसे तयार केले आहेत. आठ दहा हजारांचा भरणा एक दों दिवसांनीं तिकडे रवाना करणार. राजश्री पाटीलबावाही बारी उतरून पार जाहले. उभयतां सरदार एकत्र होऊन सोनगडजवळ गेले. दरमजल पुढें जाणार. सोनगडाअलीकडे सहा कोसांवर मुक्कामीं होते, ते मुक्कामाचीं पत्रें पाटीलबावांचीं बाईंस आलीं होतीं. बहुत समाधानपूर्वक पत्रें होती. लिहिले होतें जे, आम्ही आतांच वडिलांचे दर्शन घेऊन मग

---

इ. स. १७८० ह्या सालचीं सुमारे तीस पत्रें उपलब्ध झाली आहेत. त्यांमध्यें पेशवे व इंग्रज ह्यांच्यामधील युद्धासंबंधीं राजकारणें, राघोबादादा पेशव्यांच्या हालचाली, महादजी शिंद्यांची राजकारणें व अहिल्याबाई व तुकोजी होळकर ह्यांच्या दरबारचीं कारस्थानें ह्या संबंधाच्या बातम्या आहेत. ही सर्व पत्रें फार महत्त्वाची आहेत.

पुढें स्वारीस जावे. परंतु फत्तेसिंग गायकवाड व अमृतराव एकत्र होऊन दरमजल अहमदाबादेकडे गेले; यास्तव श्रीमंतांचीं पत्रें वरचेवर तिकडे जायाचे निकडीचीं आलीं; यास्तव इकडे येणें प्राप्त. महिना दों महिन्यांत इकडील मसलतीचा फड अगर जाबसाल काय ठरेल ते पाहून लवकरीच दर्शनास येतों. याप्रमाणें पाटीलबावांचीं पत्रें बाईंस आलीं होतीं. बाई बोलत होती जे, फत्तेसिंग गायकवाड श्रीमंत दादासाहेबांकडे सामील जाहला; फिरून उलटेल, यास्तव दादासाहेबांनीं गायकवाडाचे कबिले आणून सुरतेंत ठेविले; म्हणून वर्तमान ऐकितों, असे बाई बोलत होती. बाजारी वर्तमान आहे कीं, अहमदाबादेचे जमीदार व शिबंदीचे लोक तमाम आधी दादासाहेबांकडे मिळाले होते, चार लक्ष रुपये शिबंदी चढली होती ते इंग्रजांनीं आपल्याकडे केलें आणि अहमदाबाद सर केली, असें वर्तमान बाजारी आहे. गुजराथ प्रांताची ठाणीं सरकारचीं तमाम अपरातफर झालीं म्हणून बाजारी वर्तमान आहे. सरकारचे रविसंक्रमणाचे तिळगुळ इकडे आले नाहींत; यास्तव बाईंनीं दोनतीन वेळां स्मरण केलें जें, यंदा सरकारचे तिळगुळ आम्हांस कां आले नाहींत ?

तस्मात् आमचें विस्मरण पडले ! मी उत्तर केलें जे या फौजेच्या रवानगीमुळें दोन दिवस अधिक लागले आहेत, परंतु स्मरणपूर्वक येतील. त्यास चंद्र १५ रोजीं कासीद जोडीबरोबर सरकारचे व आपले व तात्याकडील तीलशर्करा पत्रेंसहित आली, ती बाईंस दिली. बहुत संतोष पावली. फार स्तव केला. हरकूबाईंच्या पांचा गांवांची जप्ती उठवावी येविषयीं दोनतीन वेळां बाईंनीं सांगितलें. आतांही बोलली जे हरकूबाईंकडे अपराध कांहीं नाहीं आणि कैलासवासी श्रीमंत रावसाहेबांनीं म्हातारपणास बक्षीस दिले आहेत ते सोडावे. असें श्रीमंतांस फार फार लिहा म्हणून सेवेसीं लिहिले आहे. वोढेकरांचे वर्तमान ऐकिल्यांत आलें जे, ते अद्याप धारेसच आहेत. परंतु श्रीमंत दादासाहेबांकडीलही कारकून त्यांजकडे येत जात असतात म्हणून ऐकिलें. वर्तमान असें आहे. दुसरें भोंसले येतां येतां परतून गेले. तें वर्तमान ऐकिलें कीं, पाटीलबावांचीं पत्रें त्यांजकडे राहोरीचे मुक्कामीहून गेली. त्यांचीही पत्रें उत्तरे पाटीलबावांस आली आणि ते माघारे गेले, असेंही वर्तमान ऐकिले. सत्य मिथ्या देव जाणे. दादासाहेबांकडील केसोपंत दातार सरदाराकडे येऊन गेला म्हणून दरबारीं येथें वर्तमान ऐकिलें. देखलें वर्तमान सेवेसीं श्रुत होय. गुलजारखानाचा मजकूर हरकूबाईंच्या नांवाचा बोभाट मात्र केला, परंतु तुकोजी होळकराचे भाऊ संताजी होळकर सेंधव्यांत आहेत, ते लासुरांत जाऊन गुलजारखानास भेटून आले. त्यास, एक घोडा व चौकडा व शालजोडी ऐसी संताजी होळकारास बहुमान दिला; व मल्हारगड (?) होळकराकडे आहे, तेथें राहण्याची परवानगी घेतली; व तेथें रस्त पोहोंचवणें व तेथून डोंगरांत काढून देणें हें कृत्य त्याचें होय. तुकोजीबावाचीही त्यास अंतस्थ पत्रें आलीं जे, गुलजारखानास तसदी आपलेकडून न देणें. राखून असूं देणें. त्या पत्रांच्याही शोधांत आहेत. हस्तगत जाहलीं तर सेवेसीं येतील असे आहे. बाईंकडे अपराध कांहीं नाहीं. हे विज्ञप्ति.''

## लेखांक ४

**पुरवणी**

ता. २८ मार्च, इ. स. १७८०
मि. फाल्गुन व।।, ८ शके १७०१

''विज्ञापना मातुश्री अहिल्याबाई यांजकडील कारकून लाखेरी वगैरे दिल्लीचे आसपास यांचे खासगी एकदोन महाल आहेत, त्या चौकशीस कारकून गेला होता; तो ग्वाल्हेरीकडून त्या मार्गे येथें छ २१ रविलावलीं आला. तिकडील वर्तमान बाईंजवळ सांगत होता. मीही जवळीच होतों. त्यास ग्वाल्हेर प्रांतीं सरकारच्या फौजा सरंजामी आहेत, त्यांचें वर्तमान राजश्री खंडेराव हरी व आंबोजी इंगळे शिंद्यांकडील पथके दोघांमिळून जमियत, खंडेराव हरीजवळ तद्देशी रांगडी फौज दोनतीनशें व पेंढारी बाजारबुणगे सारे मिळून हजारांचा भरणा. आंबोजी इंगळ्याजवळ दोनअडीचशें लोक देशचे, शिवाय पेंढारी बाजार बुणगे हजारबाराशें व पवार चारपांचशें, देशची फौज व शेंदोनशें तद्देशी याप्रमाणें ते व बळवंतराव धोंडदेव यांजवळ चारपांचशें फौज देशची चांगली, शेंदोनशें तद्देशी याप्रमाणें व राजश्री शिवाजी विठ्ठल यांचे पुत्राजवळ सरंजाम हजार बाराशें फौज देशची चांगली व शेंदोनशें तद्देशी; याप्रमाणें सरंजामी सरदारांजवळ जमियत आहे. जोंपर्यंत गोहजवाल्या राण्यानें निकड केली नव्हती तोंवर या फौजांनी जागां जागां गोहजवाल्याचे प्रांतांत धामधूम केली. प्रस्तुत राणाजीजवळ चार हजार फौज व चार पलटणें व तीस तोफा व पांचसहा हजार पायदळ असून या सरंजामानशीं बाहेर निघून ते ग्वाल्हेरीच्या रोखें दरमजल चालले. ते समयीं सरकारचे सरंजामीं सरदारांनीं कांहीं त्याजवर घालमेल करावी अशी मसलत सारे मिळून रात्रीं करावी. प्रातःकाळीं खंडेराव हरी व आंबोजी इंगळे यांनीं मोडून पुढें निघायाची मसलत करावी. खंडेराव हरीनीं शेदोनशें नांगे गोसावी ठेविले होते. ते राजश्री पाटीलबावांचें पत्र आलें जे, अधिक शिबंदी वाढवूं नका. त्यावरून खंडेराव हरींनीं गोसावी दूर केले. प्रस्तुत खंडेराव हरी व आंबोजी इंगळे या उभयतांत चित्त शुद्ध नाहीं. शिवाजी विठ्ठल यांचे पुत्र व पवार व बळवंतराव धोंडदेव यांनी हरएक मसलत शत्रूपराभवाची फिरून करावी; त्यांत विपर्यास उभयतांनीं घालून पुढें निघायाची सल्ला ठरवावी. पांच कोसांचें कूच ठरविलें तर यांनी दहा कोसांचें करवावें. सारांश, ग्वाल्हेरचा किल्ला आपले हस्तगत लवकर करून पाटीलबावांस लिहून पाठवावें, हाही अन्वय त्यांच्या चित्तांत. असे वर्तमान त्या ब्राह्मणानें सांगितले. साप्रंत गोहजवाल्यानें फार जोर धरला आहे. गोहज प्रांतींचीं यांनी जें जें स्थळे घेतलीं होतीं, तितकी प्रस्तुत त्याच्या जोरेंकरून सुटत चाललीं आहेत. गोहजवाल्यानें कलकत्त्याहून एक कंपू बोलविला होता, तोही करेरीजवळ येऊन पोंहचला. त्यांतीलच हे चारी पलटणें राणाजवळ पुढें येऊन पोहोचलीं. राहिले तेही मागून येतात. याप्रमाणें त्या कारकुनानें वर्तमान सांगितलें. आठदहा दिवस त्या लष्करांत होता. वाटेची सुबत्ता पाहून निघून आला. राजश्री शिवाजी विठ्ठल ये प्रांतीं देवदर्शनानिमित्य आले होते. येथें आले. दाखल झाल्याचें वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहिलें आहे. सांप्रत त्यांच्या कुटुंबास येथें येतांच ज्वर उत्पन्न झाला, यास्तव औषधीउपाय

बाईंनीं करविला. ज्वरांत मधुरा निघाला. औषधी उपाय करितात. प्रस्तुत कांहीं उतार आहे. सातआठ रोजांनीं मशारनिल्हे माघारा जातील.''

---

## लेखांक ५

ता. ७ एप्रिल, इ. स. १७८०
मि. चैत्र शु।। ३, शके १७०२

''छ २७ रविलावलचें वर्तमान : राजश्री शिवाजी विठ्ठल तृतीय प्रहरी अहिल्याबाईंच्या दर्शनास गेले होते. पुराणसमयीं चाळीस पन्नास लोकही बसले होते. मीही होतों. शिंद्यांकडील शिवाजी नारायण दरबारास आले. पुराण झालीयावर विप्रभिक्षुक मंडळी उठून गेले. दहावीस गृहस्थमंडळी मात्र बसले होते. ते समयीं शिंद्यांकडील शिवाजी नारायण यांणीं वर्तमान सांगितलें जे, काल छ २६ रोजीं श्रीमंत राजश्री नानांनीं दोन कासीदजोड्या पुण्याहून पत्रें देऊन राजश्री पाटीलबावाकडे रवाना केले, ते काल कासीदजोड्या येथें आले. सरकारचे पत्राचे अन्वयें वर्तमान सांगत होते जे, श्रीमंतांनीं फार प्रकारें पाटीलबावांस लिहिलें आहे जे, इंग्रजांची मसलत भिजली आहे; दारमदाराचीं बोलणीं लागली आहेत, म्हणून ऐकतों. त्यास कलकत्त्याहून कंपू इंग्रजांनीं आणाविला आहे. तो येतो तोपर्यंत मात्र तुम्हांसी बोलणें बोलतील. ते सामील झालीयावर तीव्रता करतील. तर त्यांसी बोलणें युक्त नाहीं. जोंवर तो कंपू येऊन पोंहचला नाहीं, तोंवर जलदी करून इंग्रजांचे पारिपत्य होय तर बरें आहे. सरंजाम जो पाहिजे तो व खर्चास जे पाहिजे तें, येथून वरचेवर रवाना करितों. परंतु इंग्रजांचे पारिपत्यच होय असें करावें, अशी बहुत ममतापुरस्कर पत्रें लिहिली होती तीं पत्रें आज प्रातःकाळींच पाटीलबावांकडे रवाना केलीं. श्रीमंत पाटीलबावांसीं निर्मत्सर आहेत आणि तेही तसेच आहेत, असें बहुत प्रकारे वर्तमान सांगितले. बाईंनीं ऐकून स्वस्थमानस झाली. राजश्री शिवाजी विठ्ठल समजलें. बाई प्रदोषकालीं स्नानास गेली. तदोत्तर शिवाजीपंत शिंद्यांकडील कारकुनाशीं दोनतीन घटका बोलले. गोविंद कृष्ण अजमेरवाले व आणिकही दहापांच गृहस्थ होते. मीही होतों. त्यास शिवाजीपंतांनीं भाषणें केलीं जे, ''श्रीमंत थोर समर्थ. ते लिहिल्याप्रमाणें साहित्य पोंहचवतील, परंतु लोक ते नाहींत व लोकांस देहनगी मनोधारणें तशीं नाहींत. कैलासवासी श्रीमंत आप्पासाहेब वसईस लागले, ते समयीं श्रीमंत त्या लोकांसीं काय बोलले ? ''जे किल्ला सर करतां, ज्यांचें घोडें पडेल तें देऊं व शिपाई पडला त्याची बाळपर्वेसी चालवूं. वांचून येईल त्यास सर्फराज करूं'; असें त्यांनीं लोकांचीं मनोधारणें केलीं. तेव्हां लोकांनीं झडा घातल्या, किल्ला सर केला. बोलल्याप्रमाणें तसेंच लोकांचें चालविलें. त्याप्रमाणेंच कैलासवासी श्रीमंत नानासाहेब भाऊसाहेबांनीं चालवलें; म्हणूनच त्यांणीं पृथ्वी सर केली व महामहा मुखंड पराभवातें पाविले व खासा

स्वारी बाहेर निघतां कधी राहिले होते की काय ? तशा सरदारांपुढेच लोकही कामें काजे करीत होते आणि ते सरदारही लोकांस सर्फराज करीत होते. कैलासवासी श्रीमंत रावसाहेबांनींही लोकांची चहा बरीच केली, त्यामुळे सरकारही ताजें राहिलें. लोकही आबाद होते. सांप्रत सातआठ रुपयांचे महिनदार लोक; त्यांस रोजमुरा धड पावेना. त्या लोकांच्या व ते फौजेच्या भरवशावर उभयतां सरदार इंग्रज सर करणार! त्यांतही पडलें घोडें कोणाचें देऊं नये! अधिक खर्च करू नये ! अशा मसलतीवर लोक काय म्हणून झडा घालतील ? कसा इंग्रज सर होईल ? गोष्ट दुरापास्त आहे. परंतु ये मसलतीस सहाय एक श्रीमंत राजश्री रावसाहेबांचा पुण्यप्रताप. अवतारी पुरुष. त्यांच्या कृपाविक्षणें मात्र सिद्धीस पावेल. वरकड व्याघ्रादिक श्वापदें बळ व युक्ति-प्रयुक्तीनें मारतील. परंतु अस्वलाचें मारणें फार कठीण आहे ! सुरत धरून मारलें तरच मरेल. नाहीं तर अस्वलाचें चपेटींत कोणी सापडला तर गुदगुल्या करूनच अस्वल त्यास मारील. तद्वत् हे इंग्रजांची लढाई आहे. पाहतां यांचें मारणें कठीण ! हरिपंत तात्यांनीं एकदोन पलटणें बसवूनच दिल्हीं. फौज कसे कसे लोक त्यासमागमें होते आणि ते मसलतीचें स्वतः धनीपण त्यांचे अंगीं होते म्हणून थोडींबहुत कामेंकाजें झालीं. प्रस्तुतचे मसलतीसही उभयतां सरदार मातबर, हमेश कामें केलेले, हे इंग्रजांची मसलत त्यास काय अगाध आहे ?'' याप्रमाणें भाषणें झालीं. संवत्सर प्रतिपदा झालियावर शिवाजीपंत बाईंचा निरोप घेऊन लवकरच माघारें जाणार. त्यांच्या कुटुंबासही अंमळसें स्वस्थ वाटत आहे. त्यांचे पुत्र गणपतराव त्यांनींही यांस पत्रें पाठविली आहेत. पत्रें तों मीं पाहिलीं नाहींत. परंतु गोहजवाला जाट दरमजल चालून आला अशी कांहीं फार गडबड तिकडे आहे. यास्तव हे लवकरीच तिकडे जाणार. इंग्रजांचा उत्कर्ष पलीकडे हिंदुस्थानांतही फार झाला आहे म्हणून साहुकारी खबर आहे. सुजायद्दौलाचा दों करोडींचा मुलूख व रोहिल्यांचा दों करोडींचा मुलूख एकून चौ करोडींचा मुलूख त्यांनीं हस्तगत केला. अंतर्वेद आदिकरून इंग्रजांची प्रबळता हिंदुस्थानांत फार झाली आहे. हिंदुस्थानचे राजेराजवाडे सरकारचे फौजेची मार्गप्रतीक्षा फार करितात. असें तिकडून कितीक येतात ते बोलतात. आज्ञेप्रमाणें खेचीवाल्यास पत्र येथून लिहिलें आहे. त्याजकडून कोणी मातबर मनुष्य येईल तो सरकारांत पाठवून देईन. गुलजारखानाचा मजकूर : भिल्लांनीं आपल्या जीवभयास्तव त्यास हटीवरून काढून दिलें. त्याच्याही प्रयत्नास मनुष्यें लावली आहेत. हरकुबाईंनींही जागां जागां चोरबातम्या त्यास हस्तगत करावयास बसविल्या आहेत. आज छ २८ रविलावलीं खेतसी साहुकाराचे येथें अंतर्वेदीतून लिहिलें आलें जे, कलकत्त्याहून इंग्रजांनीं चार कंपू आणिक तयार करून इकडे रवाना केले. दरमजल तेथून चालले. त्यास इंग्रजांची तेथून आज्ञा आहे जे, तुम्हीं यासी न मिळतां परभारे दक्षणेस जाणें म्हणून साहुकारी वर्तमान. लखनौच्या जवळजवळ ते कंपू आले आहेत म्हणून वर्तमान आहे. शिवाजी विठ्ठल छ ३० रोजीं गुरुवारीं मागील सहा घटका रात्रीं कूच करून कोसावर रामकुंडावर मुक्काम केला. अहिल्याबाईही दोंप्रहरां तेथेंच गेली. तेथेंच भोजनेंही झाली. शिवाजी विठ्ठल यांस बाईंनीं वस्त्रें देऊन बिदा केले. चार घटका दिवस राहतां बाई फिरून महेश्वरास आली.

राजश्री विठ्ठलपंत यांस समागमें घेऊन भेटीस गेलों. दर्शनानंतर आगतस्वागत जालें. आम्हांस स्थल राहावयास दिलें. तें नामाकुल, त्याची तारीफ केली, बहुत संतोषी होऊन उत्तर दिलें कीं, तुम्हास किल्ल्यांमध्येच हवेलीस ठेवीन. मीं उत्तर दिलें कीं, ''आम्ही ताबेदार. श्रीमंतांची आज्ञा, आपली ताबेदारी करावी. जेथें ठेवाल तेथें राहून ताबेदारी करूं.'' इतकेंच बोलणें होऊन विडे त्यांनीं दिले. तें घेऊन बिऱ्हाडास आलों. कलम १

आश्विन शुद्ध ११ गुरूवार ते दिवशीं, भेट घेऊन एकांतीं बोलावयाचा उद्योग करितों, तों बाईंचा निरोप आला कीं, ''आज मजला एकादशी; दुसरे सहा घटका रात्रपावेतों बोलत नाही. उदईक तुम्ही यावें.'' याप्रमाणें निरोप आला तेव्हां तो दिवस तसाच, भेट जाली नाहीं. कलम १

आश्विन शुद्ध १२ शुक्रवारीं, दोन प्रहराचे समयीं पाचारण आलें. मग राजश्री विठ्ठलपंत यांस घेऊन गेलों. तेथें गेल्यावर सर्व मंडळास निरोप देऊन बाईंचे नातू व मी त्रिवर्ग बसलों. स्वामींनीं आज्ञा केली, तितके अक्षरें त्यांसीं बोलून पत्र व याद पुढें ठेविली. विनंति केलीं कीं, आज्ञा होईल तर पत्र व याद वाचून दाखवीन. तेव्हां उत्तर बाईनें दिलें कीं, मुकुंदास बोलावितें. मी उत्तर दिलें कीं, आपले आप्त असेल त्यास बोलाऊं पाठवावें. तों म्हणाली कीं, तो त्यांचा भाचा आहे. मी उत्तर दिलें कीं, भाचा व पुतण्या मी ओळखत नाहीं. आपली खातरजमा असेल त्यास बोलाविलें पाहिजे. मग मुकुंदभाऊ थोरले कोण त्यास बोलावून आणलें. त्यांनीं पत्र वाचून दाखविलें व याद दाखविली. ऐकून सक्रोध फार जाली. कलम १

त्यांतील भाषणें कीं, ''तुकोजीचे व नारोबाचे मनांत कीं, मी सकूबाई शिंदे याप्रमाणें असावें. वरचेवर जवळ आहेत. माझी नालीश उभयतां कारभारी त्यांजपाशीं करतात. महाल त्यांजकडे आहेत. मजकडे महाल कोणते?'' मीं उत्तर दिलें कीं, ''याद बजिन्नस त्याप्रमाणें महाल तुमचे तुझ्याकडे. त्याचा जाबसाल पुढें करावयास येईल. फौजेचे बेगमीस महाल, त्यापैकीं त्यांचे रूकार आहेत, ते महाल त्यांजकडेस चालतात. राहिले महाल त्यांचा मार्ग? आपण पैसा घेतला असें खरें असल्यास द्यावा. अथवा कमाविसदार यांजकडे दुसाला ऐवज राहिला असेल, त्यांस ताकीद आपली होऊन तो ऐवज देववावा. आपले ठिकाणीं मदारूलमहा यांचा भाव इतर नाहीं. कैलासवासी मल्हारराव होळकर सुभेदार आहेत आणि आपण नाहीत याप्रमाणें निश्चय कोणाचे सांगितल्यावर त्यांची मर्जी नाहीं. रियासत पातशाही करितात, तें कोणाचें सांगितल्यावर करीत नाहींत. महालाचा जाबसाल दादाजी गंगाधर यांचे हातची याद ते आपणास प्रमाण. त्याचप्रमाणें उत्तर द्यावे.'' इतकें मी बोलतो. तों म्हणाली कीं, ''महाल त्यांजकडेसच आहेत; तुम्हींच लिहून पाठविणें.'' मी उत्तर दिलें कीं, ''माझी खातरजमा होईल तर लिहीन. नाहीतर तुमचें तुम्ही उत्तर लिहावें.'' मग ती याद व पत्र मुकुंदराव याचे हवालीं बाईंनीं केली आणि त्यांस सांगितलें कीं, या महालांत त्यांजकडे पैसा कोणता पावला नाही, त्याची याद लिहून पाठवावी. मजला म्हणाली कीं, दसरी शोध करून तुम्हास सांगू. याप्रमाणें मजला बोलून विडे दिलें. याप्रमाणें काल बोलणें

जालें. एक दिवस लगेच रामरामास जाऊं. दोन दिवसांनंतर मागतीं जाबसाल पुसेन.
कलम १

खरगोण बत्तीशीस राजश्री कृष्णाजी तानदेव बाईकडून गेलें. तो महाल आमचे यादीस नाहीं म्हणून बाईंशीं बोललों नाहीं. कलम १

येथील प्रसंगीचे वर्तमान लिहिलें. सक्रोधता जे लिहिली ती प्रसंगानुरुप. त्याप्रमाणें चित्तांत नाहीं. आज प्रात:काळीं सांगून बाईंनीं पाठविलें कीं, ''आतांसींच पत्र यजमानास लिहूं नका. मीं याद घेतली आहे. त्याची चौकशी करून तुम्हांस समजावीन. मग तुम्ही पत्र लिहा. तोवर लिहूं नका.'' मी उत्तर दिलें कीं सुखरूप पावलों हे वर्तमान लिहितों. ऐसें सांगून डाकेचे जासुदासमागमें पत्र पाठविलें आहे. कलम १

राजश्री माधवराव गंगाधर यांस निरोप सांगांवयाचा तो सांगांवा, परंतु ते येथें नाहींत. राजश्री पाटीलबाबांचे सैन्यांत आहेत. कलम १

सरकारची उंटें दोन व घोडीं दोन व जासूद असामी ४ व सारवान व पोरगा सर्व सुखरूप आहेत. कलम १

बहुत काय लिहिणें, लोभ प्यार असावा हे विज्ञप्ति.''

---

## लेखांक १२७

**श्री** ता. १९ आक्टोबर, इ. स. १७८२

''पुरवणी पत्र श्रीमंत राजश्री नानासाहेब व तथा राजश्री तात्याजी स्वामींचें सेवेसीं.

विज्ञापना ऐसी जे : बाईंची भेट जाली. ते दिवसीं मेजवानीचे साहित्य येणेंप्रमाणें आलें, तपशील :

३ चंदीस जिन्नस वजन पक्कें
  - १।। हरभरे
  - १।। ज्वारी
  - ———
  - ३

२१ मुदबक साहित्य वजन पक्कें
  - १ कणिक
  - ।। तांदूळ
  - १५ दाळ
  - ७ तूप
  - ५ गूळ
  - २ मीठ

ꣳ १ तेल रोशनाईस

ꣳ २।

ꣳ ।। सुपारी वजन पक्कें

२०० पाने नागवेलीची सुमार २००

०।०।०।। २०० ० नख्त व तृणकाष्ठ

एकूण वजनी तराजूचे पांच मण साडे दहा शेर व सुमारी दोनशें याप्रमाणें त्यांजकडील कारकून व खिजमतगार घेऊन आला. त्याचे रुबरु सर्वांस देऊन, राहिली जिन्नस दोन चार शेर ते आम्हीं ठेविली. आपणांस कळावे. बरोबर राऊत असामी १३ आहेत. त्यांचा रोजमरा भाद्रपदचा दिला. आश्विन मासींचा देणें. त्याजविषयीं त्यांचा तगादा आहे. याविषयीं आज्ञा होईल तसें करुं. येतांना मार्गात जांबगांवावरून आलो. हवेली व किल्ला पाहिला. चार सहा घटका राहून सर्व अवलोकन केले. येथून एक मुक्काम अशेरीस केला. तोही किल्ला पाहून पुढें महेश्वरास आलो. येथील किल्ला पाहिला. सेवसीं श्रुत होय. बहुत काय लिहिणें. रवाना छ ११ जिलकाद लोभ प्यार असावा हे विज्ञप्ति.''

---

## लेखांक १२८

पैवस्ती छ २६ जिल्हेज
सन सलास, कार्तिक मास

**श्री**

ता. १३ नोव्हेंबर, इ. स. १७८२

''श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं :

आज्ञांकित केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ ७ जिल्हेज मुक्कम महेश्वर येथें श्रीकृपेंकरून सुखरूप असों. विशेष : येथें पथ आज्ञेप्रमाणें घातला होता कीं पत्रें देऊन उत्तरें पाठवावीं. आज्ञा येईल तसे वर्तन असावे. परंतु प्रथम बोलणें एक प्रकारें पडलें. त्याचें उत्तर प्रति उत्तर व बाईंनीं पत्रें लिहून दिधलीं ती व मी पत्रें लिहून छ २१ जिलकादीं जासूदजोडी सेवेसीं रवाना केली, ती पोहोचली असेल. अलीकडे कार्तिक शुद्ध १ राजश्री रामजी पाटील व राजश्री सदाशिवराव येथें आलें, बाईंची भेट घेऊन एक मुक्काम केला. ते दिवशीं मी भेटीस जात होतों. त्यांत चिठ्ठीच राजश्री सदाशिव रावजींची आली. मग भेटीस गेलों. समक्ष उभयतांची भेट जाली. पुसूं लागले कीं तुम्ही येथें आलात, ते काय सांगून पाठविलें ? मीं उत्तर दिलें, आपणास समजलेंच असेल. तथापि, आज्ञा येतेसमयीं इतकी केली कीं पत्रें देऊन उत्तर पाठवावें. तुम्हीं तेथें असावें, आम्ही लिहूं तसें वर्तत जावें, याप्रमाणें मजला आज्ञापिलें. मग म्हणाले कीं हें खरें, त्यावरून दोप्रहरां मध्यान्हीं निरोपसमयीं मजला बोलावून बाईंचें रूबरू सांगितलें कीं, श्रीमंतांच्या आज्ञेप्रमाणें

येथें वर्तणूक करावी. आम्ही राजश्री पाटीलबावांकडे जातो. त्यांजपाशीं जाऊन तेथून पत्रें श्रीमंतांकडे जातील. तोंवर तुम्ही येथें उगेच असावें. कांहीं बोलूं नये. याप्रमाणें समक्ष सांगून गेले. आपण गेले. मीं उत्तर दिलें, यजमान स्वामी आज्ञा लिहितील तसे वर्तावें लागेल. दृष्टिगोचर वर्तमान जालें, ते लिहून सेवेसीं पाठविलें असे. हल्लीं बाईंनीं जोडी पुण्यास पाठविली. दोन दिवस पत्राचे मसुदे होत होते. तीं पत्रें आजच प्रात:काळीं रवाना जालीं. राजश्री दादाजी गंगाधर यांजकडे पत्रें पाठविलीं. त्यांचे पुतणे राजश्री वासुदेवपंत येथें आहेत, त्यांनीं रवाना केलीं. मजला वासुदेवपंतांनीं सांगून पाठविले कीं, सरकारांतून जो कोणी येतो, तो आमचेविषयीं बाईंस भेटतो. राजश्री बाबूराव वैद्य आले, तेही आमचेविषयीं बाईंस भेटले. तुम्ही आम्हांस टाकून भेटलां. मी उत्तर दिलें कीं, रावजींचा व तुमचा स्नेह, ओळख. मी गरीब कारकून. पत्रें श्रीमंतांची देऊन भेटलों म्हणून काय जालें ? इतकें उत्तर पाठविलें. राजश्री पाटीलबाबा फौजेसुद्धां ग्वाल्हेरच्या व गोहदच्या मध्यें आहेत. फौज फार आहे. गोहदवाला बाहेर निघत नाही; किल्ल्यांत आहे. जमियत सात पलटणें, चार हजार फौज इतकी आहे. बाहेरील अंमल सरकारचा आहे. येथें वर्तमान ऐकिलें ते लिहिलें असे. बहुत काय लिहिणें. लोभ कीजे हे विज्ञप्ति.''

---

## लेखांक १२९

**श्री** नोव्हेंबर, इ. स. १७८२

''पुरवणी श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं :

साष्टांग नमस्कार विनंति ऐसीजे : येथील वर्तमान सांप्रत किल्ल्याची खबरदारी व रहाते हवेलीस हातेऱ्या वगैरे यांची तरतूद होत आहे. कारभारी चार आहेत. एक मुकुंदराऊ, नारो गणेश यांचे भाचे. ते दिवाण. सरंजामास महाल आहेत, त्यांचा कारभार त्यांजकडे. दुसरे छोटे मुकुंदराऊ. ते नारोपंत यांचीच निसबत. त्यांजकडे जामदारखाना. तिसरें गोविंदपंत गानू, ते खासगत देवी व माहाल खेडीं आहेत, त्यांचा हिशेब व खासगत खर्च, त्यांचा हिशेब, जमाखर्च ते पाहतात. चवथें, बाळाजीपंत दप्तरदार तेही आहेत. यांची प्रतिष्ठा बाहेर लोकांस आहे. तिजपाशीं किमपि नाहीं. लोभावर दृष्टि देऊन मनास येईल तसा पैसा मिळवितात. रुबरू १० वेळ फजितही केलें. ऐसेंही पाहिलें व ऐकिलेंही आहे. कुलआखत्यार आपला ठेविला आहे. जें करणें व देणें, ते आपले परवानगीशिवाय होत नाहीं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.''

---

## लेखांक १३०

**श्री** नोव्हेंबर, इ. स. १७८२

''पु।। श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं :

साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजे : येथील बोलण्याचे पर्याय इस्तकबीलपासून आजपावेतों पांच महिने एकसारखेच पाहत आलो. हे खावंदास आम्हीं न लिहावें तर सेवकाकडे हरामखोरी येते. करणें तें खावंद, समय मसलत पाहून करितात. आमचे लिहिलेंवरून करीत नाहींत. परंतु कच्चें वर्तमान आहे. सेवकानें लिहित असावे. येथें आलो तेव्हां प्रथमच बाई बोलली, ते वर्तमान डाकेबरोबर छ. ११ जिल्कादचें पत्र राजश्री विठ्ठल शामराज यांचे विद्यमानें लखोटा दिला. तें पत्र स्वामींस पावलें न पावलें, हें कळलें नाहीं. यास्तव विनंति लिहिली असे. ह्या पत्राचे अर्थ हींच उत्तरें त्या दिवसापासून आज तागाईत एकच पद्धत! दुसरें मनांत येत नाहीं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.''

---

## लेखांक १३१

**श्री** इ. स. १७८२

''सेवेसीं शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजे : येथें येऊन फार सहवास बाईंचे चित्तवृत्तीचा करून फळ नाहींच जालें. समज नाहीं. जें एक वेळ चित्तांत भरलें, तें जात नाहीं. आधीच स्त्रियांचीं चित्तें बद्धमुष्टिवत् अलंकारीं सांगितली. त्या बद्धमुष्टिचित्ताचे निवृत्त पदार्थ आहेत. ते आवस्थात्रय प्रकारें आहेत. ही आवस्थात्रयातीत जाली, यामुळें साधन घडत नाही. खावंद-मसलतीचे लौकिक अर्थ तें ध्यानांत येत नाहीं. मसलतगार मातबर माणूस लौकिकाचा असाही कोणी जवळ नाही. जें करावे तें आपण आपले मतें करीत असावें. मग बिघडो अथवा सुधारो ही तऱ्हा आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.''

---

## लेखांक १३२

**श्री** इ. स. १७८२

''पुरवणी पत्र श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजे : श्रीमंतांकडील कोणीं जाबसाल केल्यास प्रसन्नता दिसत नाहीं. आम्हीं जावें तर त्रासरूप भासत असावें. तिच्या मायेंत शिरून जाबसाल केला, तरी विश्वास येत नाहीं. दोन-तीन दिवसांआड जातों. नित्य जात नाहीं. बाईंचे घराशिवाय इतर घरास कोणाचे

जात नाहीं. साधनाच्या वाटा आहेत, त्या वाटेनें, हें साधन करावें, तर तिजला लटकें भासते. दौलतीत खर्च, दानधर्म वगैरे शिबंदी सालीना कुलखर्च अटकळींत दोन लक्षांपावेतों अजमास. वरकड अर्थ संग्रहरूप आहे. कारभारी पावत्या वाचून दाखवितात. महालोमहालचे हिशेब दोन तीन सालांचे एकदांच दाखवीत असतात. तेही रुबरू एक दोन वेळ पाहिल्यांत आले. त्याचीं कलमें थोक थोक वाचून दाखवावीं. मग कमाविसदार व कारभारी यांनीं मनास येईल तसा कागद करून शिक्के करून द्यावें. याप्रमाणें वर्तणूक. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.''

---

## लेखांक १३३

पैवस्ती छ ७ सफर सन सलास **श्री** ता. २८ डिसेंबर, इ. स. १७८२

''श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं :

आज्ञांकित केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २२ माहे मोहरमपावेतों श्रीकृपेंकरून मुक्काम महेश्वर रेवातीर येथें सुखरूप असो. विशेष : पूर्वी पत्रें सेवेसीं पाठविली होती, ती पावलीं असतील. सांप्रत येथें वर्तमान परस्परें ऐकिलें कीं, श्रीमंत राजश्री पंतप्रधान रावसाहेब यांच्या लग्नाचा निश्चय माघ शुद्धांत जाला. तमाम कारखाने जारी जाले आहेत. दहा लक्षांची नेमणूक जाली. हें वर्तमान कळल्यावर सत्वशील बाईंस सांगितलें. त्यास संतोष पावली. सदय हृदय फार ते दिवशीं पाहिलें. कैलासवासी नानासाहेब या प्रांतीं आले होते, ते समयीं मालजी होळकर भेटावयास गेले, त्यांस आपले जवळ पालखींत घेऊन बसले. बहुत ममता केली. श्रीमंतांची ममता आम्हांवर फार. वारंवार स्मरण करून नेत्रास उदक आणिलें कीं, ईश्वर रावसाहेबांस सलामत राखो. मातुश्री बाईंसाहेब गंगापुरीं आहेत. मोठे कठीण चित्त केलें कीं, श्रीमंतांस हा कालवर पाहिलें नाहीं! आतां लग्नासाठी येतील किंवा नाहीं? ऐसें बहुत प्रकारें बोलली. लग्नाचा निश्चय माघ शुद्धांत असें असल्यास, मागती बातमी आणून मजला सांगावें, म्हणून बहुत वेळ सांगितलें. या प्रमाणें वर्तमान जालें, तें सेवेसीं लिहिलें असे. लग्नाचा नेम जाल्यावर बाईंस, आग्रह येण्याविषयीं स्वदस्तुर पत्रें लिहावी. कदाचित आली तर फारच लौकिक उत्तम आहे. म्हातारपण, ममता तो श्रीमंतांचे चरणीं विदित जाली आहे. आपण लिहिल्यास येतील. स्वामींजीची आज्ञा आल्यावर बाईंस येण्याविषयीं लागूं होऊं. बहुत काय लिहिणें. लोभ असो दिला पाहिजे हे विज्ञप्ति.''

---

# लेखांक १३४

**श्री** ता. १ जानेवारी, इ. स. १७८३

''पुरवणी पत्र श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं :

साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजे : मजला येथें येऊन पांच महिने जाले. दोन हजार रुपयेपावेतों कर्ज घेऊन खाल्लें. सरकारचे कामाचा जाबसाल कांहीं घडला नाही. तेव्हां व्यर्थ चार रुपये खाऊन स्वामींचे उपयोगी नाहींसा होतों. पंरपरा माझे वडिलांनीं स्वामींचे आर्जव करून, आम्हांस उपयोग तें होत नाहीं. स्वामींचे शासनाचें रात्रंदिवस भय. या अर्थी येथील रीतभात पत्रीं लिहितां विस्तार. मुख्य वृद्ध, तिचें साधन करावयाचें तें करून पाहिलें. तिजला मोठा गर्व कीं, मी शहाणी व सुभेदारामागें एकनिष्ठ, अथवा दौलत केली ती मीं केली व दानधर्म आचरण तें माझे, हा अभिमान. परंतु इतकें खावंदांचे लक्ष्यवेगळें व्यर्थ, हेंही त्यासीं बोलण्यांत आणलें. तथापि, ते मनांत न येतां, सरकारचे लिहिल्याचा भाव काय, हें पाहून वर्तणूक असावी, ते दिसत नाहीं. हल्लीं छ १५ मोहरमचें पत्र बाईंस पाठविलें, त्याची नक्कल मजला पाठविली. त्या पत्रांत अवधि कोणतीही राहिली नाहीं. वारंवार त्या पत्राप्रमाणें बोलत असतां मनासच येत नाहीं. आचरण दाखवितां लौकिकीं फार चांगलें दाखवितात. अंतर शुद्ध नाही. खावंदांचे मसलतीचे अथवा लिहिण्याचे पर्याय सुचून वर्तणूक करावी, तें घडत नाहीं. कारभारी यांनीं सुचवावें, तर त्यांचे मानस बाईंची दौलत राहो अथवा न राहो ! हेंहि सहजांत बोलण्याचे आशयांत निघालें, लग्नास श्रीमंत राजश्री साहेबाचे बाईंनीं जावें म्हणोन कारभारी यांस मीं सांगितलें कीं, सर्वोपरी, चांगलें, जावें हे उत्तम. त्यात भाव जर यांचे न गेल्यानें (असंतोष) व गेलियानें संतोष ऐसेंही दर्शविलें असतां, कारभारी कोणी जाऊन एकांतीं बोध करून घ्यावयाविषयीं सांगितलें नाही. कारभारी यांस मी कोण, कोणापासून आलों, हे कांहींच कोणाचे मनांत नाहीं. वास्तव वर्तमान कळावें म्हणोन सेवेसीं लिहिलें. बहुत काय लिहिणें. लोभ कीजे हे विज्ञापना.''

---

# लेखांक १३५

**श्री** ता. १४ जानेवारी, इ. स. १७८३

''पुरवणी पत्र श्रीमंत नानासाहेब स्वामींचे सेवेसीं :

विज्ञापना ऐसीजे : राजश्री विनायक बाजी, राजश्री दादाजी गंगाधर यांचे चुलतबंधु, त्यांनीं बाईंकडील अर्थ बहुत फारसे बोलते. ते माहीत फार. कैलासवासी सुभेदार त्या वेळेस कारभार त्यांनीं केला. इतकी माहितगिरी माझी नाहीं, इतकी सांगूं लागले. त्यास उत्तरे त्याचीं मऊ बोलल्याप्रमाणें दिलें. शेवटीं त्यास एकच गोष्ट सांगितली कीं, हे पर्याय आम्हांशीं बोलून फळ नाहीं. तुम्ही सांप्रत पुण्याहून आला, तेथेंच बोलून यावयाचें होतें. यावर बोलले कीं,

तुमची रवानगी इकडे केली, ती आम्हांस कळली नाही. कळली असती तर तेथेंच दादाजी बाईंकडील जाबसाल करितात. बाई जाबसाल करिते. तुमचे रवानगीचें प्रयोजन पडतें ना! मी उत्तर दिलें कीं, आतां ही मनाई येईशीं असल्यास आणावी. माझा आग्रह खामखा आहे कीं काय ? याप्रमाणें त्यांसीं बोलणें जालें. छ १६ सफरीं, यावर बाईंची गांठ पडावयाची, पुढें कसें बोलतात तें कळेल तसें वरचेवर लिहित जाईन. पक्केपणें उत्तर १० वेळ घेईन, तेव्हां मुजरद जासूदजोडी रवाना करीन. तोंवर आपलेकडून उतावळी करून उत्तर लिहित नाहीं आणि बाईही साफच बोलतात ऐसेंही नाही. सरकारलक्ष कसें, तसें त्यांचें मानस. सरकारलक्षाप्रमाणें चालावेसें जाल्यास सर्वोपरी चांगलें, ऐसें त्यांचे मुखें एक वेळ खरे करून, पक्केपणें उत्तर होईल तसें लिहीन. सेवेसीं रविसंक्रमणाचे तीळ पाठविले आहेत, ते पावतील. स्वीकारून उत्तराची आज्ञा करावी. बहुत काय लिहिणें लोभ असों द्यावा हे विनंति.''

---

## लेखांक १३६

**श्री** ता. ३० जानेवारी, इ. स. १७८३

''श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींजीचे सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २६ माहे सफरपावेतों सेवकांचे वर्तमान यथास्थित असो. विशेष : बाईंचे येणें होत नाहीं. बहुत आग्रह केला. कित्येक गोष्टींचा संशय तो प्रकार त्यांनीं सुचविला. त्याचें निराकरण सुचलें तसें केलें असतां अपमान केला. यावें, यांत त्यांचें चांगलें होतें व स्वामींस संतोष होता. त्यांनीं काय विचार करून राहिली, हें समजून येत नाहीं. आग्रह कीं रेवा उतरणें नाहीं. शेवटीं हें भाषण केलें. त्यावरून त्यांचें उत्तर घेऊन डाकेबरावर रवाना केले. ते सेवेसीं पावेल. हल्लीं राजश्री बापू आनंदराव कारकून निसबत उष्टरखाना यांस बाईंनीं आहेराचे कापड व जवाहीर देऊन पाठविलें आहे. हें येऊन सेवेसीं पोहोंचतील. बहुत काय लिहिणें. लोभ असो द्यावा हे विनंति.''

---

## लेखांक १३७

**श्री** ता. १२ फेब्रुवारी, इ. स. १७८३

''पुरवणी श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं :

साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजे : छ ९ रविलावलीं बाईंकडे गेलो. त्यांस विनंति केली कीं, श्रीमंतांची पत्रें व जोडी येऊन एक महिना पांच रोज जाले. हा काल आपलें उत्तर कांहीं लिहिल्याप्रमाणें होत नाहीं. मध्यें मध्यें विनंतिही आपणास करीत आहें. वरचेवर सुचनेस आळस करीत नाहीं. यावर जासूदजोडी किती दिवस ठेवावी ? तेव्हां बाईंनीं उत्तर

दिलें कीं, ''मजपाशी साफ पैका नाही. तुम्हांस कळेल तसें लिहून पाठवा. मी काय सांगू?'' ऐसें बाई बोललियावर मी उत्तर दिले कीं, ''हें आपण उत्तर देतात, हें ठीक नाहीं. मसलतीवर नजर असावी व श्रीमंतांनीं लिहिलें ते पर्याय ध्यानांत असावे. यावर पत्राचे उत्तराखालीं न घालावें ऐसें श्रीमंतीं लिहावें'' याचें उत्तर बाईंनीं दिलें कीं, ''पत्रें हजारों ऐशीं येतात. मी काय करावें? उखळांत डोकें घातलें, यांस कोठवर भिऊं?'' याप्रमाणेंच साफ बोलली. यावर विनंति करावयाची मर्यादा राहिली नाहीं. सेवेसीं श्रुत होय बहुत काय लिहिणें, लोभ कीजे हे विज्ञापना.''

---

## लेखांक १३८

**श्री** ता. १८ फेब्रुवारी, इ. स. १७८३

''श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं :

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति विज्ञापना तागाईत छ १५ रविलावलपावेतों श्रीकृपेकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. छ १५ मोहरमचे पत्र बाईंस पाठविले, ते छ ६ सफरीं पावलें, पत्रार्थ तो श्रवण बाईंनीं करून, उत्तर प्रतिउत्तर होत होत, आज दीड महिना आला. सरकारमसलतीचा उपयोग अथवा सरकारचे लिहिण्याचे अर्थ मनात येऊन आज्ञेप्रमाणें करावें ती गोष्टच होत नाहीं. बाईंची दूरआंदेशी व समज पोख्त हे स्वामी लिहितात, तें खरें. ती समज येथें दिसत नाहीं. येथील रीतभात पाहून वर्तमान न ल्याहावें, तर सेवकाकडे दोष येतो. बाई पत्राचें उत्तर देतात. आज उद्यां असें करतां ८-१५ दिवस जाले. उत्तराची प्रतीक्षा करून वर्तमान ल्याहावें तर दिवसगत लागतील. यास्तव सविस्तर वर्तमान लिहून पाठविलें. मागाहून बाईंची पत्रें तयार जालीं म्हणजे घेऊन जासूदजोडी रवाना करितों. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.''

---

## लेखांक १३९

**श्री** ता. २४ फेब्रुवारी, इ. स. १७८३

''पुरवणी श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं :

साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजे. छ २१ रविलावल बाईंकडे जाबसालासाठीं गेलो. पत्राचे अन्वयें बोलत असतां उत्तर पत्राचें देतें, उतावळी करावी असें नाही. तूर्त लग्नाची गडबड तेथें आहे. विलंबेंकरून उत्तरें गेलीयास चिंता नाहीं. परभारें शोध घेतला. पत्रें लिहून देत होती आतांच स्थिरता याचे कारण काय ? त्यास राजश्री बाळाजीपंत दप्तरदार दिंमत

राजश्री जयराम राजश्री फडणीस यांनीं सांगितलें कीं, सरकारचीं पत्रें आली. त्यांच्या नकला करून व आपलें पत्र राजश्री पाटीलबावांकडे पाठविलें आहे, त्यांची उत्तरें येतील त्यासारखें तुम्हांस जाब लिहून द्यावयाचा न द्यावयाचा देतील. त्याप्रमाणें पक्की बातमी लागली ते सेवेसीं लिहिली असे. येथील वर्तमान, सविस्तर पूर्वी छ १५ रविलावलचे पत्रें पाठविलीं आहेत, त्यावरून श्रवण होईल. राजश्री पाटीलबावांकडून जाबसाल आलियानंतर जासूदजोडी सेवेसीं रवाना करितों. तेथील लिहिण्याचे विचारें करणार. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.''

---

## लेखांक १४०

**श्री गजानन** ता. १० मार्च, इ. स. १७८३

''सेवेसीं केसो भिकाजी व विठ्ठल शामराज साष्टांग नमस्कार विज्ञापना. मल्हारराव कोल्हापुरकर, श्रीमंत राजश्री दादासाहेबांजवळ महिपतराव आहेत. त्यांचे बंधु व आनंदराव पवार हे उभयतां, पाटीलबावांच्या लष्करातून आंबाजी इंगळे ह्यांचे विद्यमानें श्रीमंत राजश्री दादासाहेबांकडेस जाऊन, त्यांसी बोलून फिरून शिंद्यांच्या लष्करांत महेश्वरीं एक दिवस राहून गेले, हें तथ्य वर्तमान आहे. परंतु काय बोलून गेले हें कांहीं कळलें नाहीं. भोपाळवाले पठाण मुख्य टिकाईत, त्याचा चुलत भाऊ कादरखान, त्याचा धाकटा भाऊ अशक महमद खान शंभर स्वारांनिशीं भोपाळच्या सरदेस उमेदवार होते. त्यास कृष्णाजी तानदेवांचे पुत्र लक्ष्मणराव कृष्ण हे चंद्रावत वगैरे मवासावर गेले होते. दोनशें स्वार, हजार पायदळ यांजसांगातें होतें. इंदुरींहून दोन तोफा नेल्या होत्या परंतु मवासाचा जोर अधिक, वास्तव भोपाळवाले हे पठाण सरदेवर होते. लक्ष्मणरायांनीं आपल्याकडे बोलाविले. ते दोनशां लोकांनिशीं पठाण यांस सामील जाले. मवासाचें पारिपत्य करून पठाणांनीं कामकाज चांगलें केलें. यास्तव लक्ष्मणरायांनीं या पठाणास पंचवीस लोकांनिशीं येथें चंद्र ३ मिनहूस घेऊन आले. लक्ष्मणरायांनीं बाईंजवळ पठाणाचे मर्दुमीची तारीफ फार केली. बाईंनीं त्यास मेजवानी दुरोजा पाठविली, आणि चंद्र ६ रोजीं तृतीय प्रहरीं पठाणास भेटीस वाड्यांत घेऊन आले. बाई आंत समोर बसली. अलीकडे दालनांत यांनीं आपले लोक व मुत्सद्दी बसविले. पठाणाकडे आणायास मुकुंदराव हरी व वासुदेव चिमणाजी पाठविले होते. दहा पंधरा खाशांनिशीं पठाण आले. दालनांत येऊन बसले. दुरून बाईंस मुजरे केले. दोन घटका बसले होते. विडे देऊन बिदा केले. कृष्णाजी तानदेवास खरगोणास बोलावूं पाठविले. आज-उद्यां आल्यावर त्यांचे विद्यमानें पठाणाशीं बोलतील. बनलें तर चाकर ठेवतील, नाहींतर बिदा करतील. काय होईल ते मागाहून सेवेसीं लिहीन. देखिलें ऐकिलें वर्तमान सेवेसीं श्रुत होय, हे विज्ञापना.''

---

## लेखांक १४१

पै छ २५ रविलाखर सलास **श्री** ता. १० मार्च, इ. स. १७८३

''सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ ६ रविलाखरपावेतों श्रीकृपें सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष : येथील वर्तमान छ १५ रविलावलची पत्रें लिहून डाकेबरोबर पाठविली, ती सेवेसीं पावलीं असतील. अलीकडे बाईंसीं बोलणें होत होतें. त्यास छ २९ रविलावलीं, बाईंनीं सांगितलें कीं, राजश्री पाटीलबावांस पत्रें लिहिलीं आहेत. त्यांचीं उत्तरें आलीं म्हणजे तुम्हांस काय तें सांगूं. हे वर्तमान परस्परें ऐकिलें होते. त्यावरून छ २३ रविलावलचें पत्र लिहून सेवेसीं पाठविलें, तें पावलें. हल्लीं बाईंनींही याप्रमाणें सांगितलें. छ १५ रविलावलचें आज्ञापत्र आलें, तें छ १ रविलाखरीं पावलें. ते दिवसीं राजश्री रंगराव वोढेकर मेजवानीस आले होते. बाईंनीं मेजवानीं केली. वस्त्रें खासे व मुजमदार फडणीस यांस दिली. ते दिवसीं रात्र फार जाली होती. दुसरें दिवसीं पत्रें घेऊन गेलों. सरकारचें प्रश्न बाईंस दिल्हें व राजश्री तुकोजीबावा यांचे पत्र दिल्हें. दोन्हीं पत्रें पाहून फडणीसांनीं अक्षरक्षः वाचून दाखविलीं. तद्नंतर बोलली कीं, मजकडे मागील ऐवज कोणता, हे चिरंजीवास लिहून पाठवितें. इतके बोलून स्नानास उठोन गेली. रात्रीं पत्र लिहून मजकडे पाठविलें कीं हे पत्र लिहून पाठविलें, याचें उत्तर येईल तोंवर जोडी ठेऊन घ्यावी. म्हणून कारकुनासमागमें सांगोन पाठविलें. त्या पत्राचा अर्थ दोन लक्ष रुपये कोठून द्यावे? मागील ऐवज कोणता कोठें आहे? त्यांच्या पत्राचा मजकूर जमेस धरून खाले इतकें लिहिलें होतें. दुसरें दिवसीं मीही गेलों. आपण पत्र लिहिलें. तिजला ठीक नाहीं. दोन-तीन सालचा ऐवज महालसंबंधें येणें, त्याऐवजीं सरकारलक्ष ठेऊन दोन लक्ष रुपये द्यावयाचे होते. मग वाफगांवास लिहून पाठवावे कीं, तुम्ही वरात केली तो ऐवज दिल्हा. हें ऐकून बहुत तिरस्कार पावली. उत्तर केलें, तें मनास येईल तसें केलें. उत्तर वाफगांवचें येईल, तेव्हां सांगणें तें सांगूं. राजश्री आंबाजी इंगळे यांजकडील मजकूर वेगळे पत्रीं लिहिला आहे. त्यांजकडील कारकून राजश्री बाजीराव बर्वे यांची भेट घेऊन गेला. रावजींस मी विचारलें. सहजांत त्यांनीं उत्तर दिल्हें कीं, मीही ऐसेंच ऐकिलें. कारकून भेटला हे कांहीं त्यांनीं सांगितलें नाहीं. शपथपूर्वक निखालसपणें दाखवितात. अंतर्भाव शुद्धत्वें स्वामींकडे शपथ सांगतात. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.''

---

## लेखांक १४२

**श्री** इ. स. १७८३

''सेवेसीं साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजे :

तळेगांवचे मुक्कामीं दादासाहेबांशीं व पाटीलबावांशीं जो तह जाला, त्या तहाप्रमाणें दिवाणगिरी करार. आम्ही झांशीस येतो. तेथें आलीयावर तुमचे आमचे विचारे जे सल्ला करणें तो करूं व बाजीराव यांस चिरंजीव बाजीराव बर्वे याची दिवाणगिरी सांगितली. त्याप्रमाणें तुम्हीं करार करून बाजीराव बर्वे यांचे नांवें पाठवावा. याप्रमाणें तुमचीं पत्रें आलीं म्हणजे आम्ही येऊं, ऐसें लिहिलें, आनंदराव पवार लष्करांत गेले. कलम १

पुढें आनंदराव पवार गेले होते. मागाहून मल्हार नाईक व शामराव मशारनिल्हेचे मेहुणे परशरामपंत गणपुले हे त्रिवर्ग गेले. यांनीं जिवबा शेणवई व राणेखां भाई यांचे विद्यमानें पाटीलबावांसीं बोलून दादासाहेबांचे नांवें पत्रें व यादी करार करून, बाजीराव बर्वे यांचे नांवें पत्र ऐसें घेऊन, माघारें आनंदराव पवार व आनंदराव कारकून व शामराव हे तिघे येथें आले. ते गुप्त राहून रावजींस भेटले. पत्रें दिधली. यादी दाखविल्या. हें पाहून यादी ठेऊन नावांचें पत्र दादासाहेबांकडे त्रिवर्ग यांजबरोबर पाठविले. तेव्हां बाईंची भेट जाली नाहीं. त्रिवर्ग सुरतेस जाऊन पत्रें देऊन मागती जाब घेऊन येथें आले. येथून रावजींनीं पत्रें लिहून पाटीलबावांकडे रवाना केलें. तीन वेळ आले गेले. जाबसाल हाच. याउपरी आणिक कांहीं असल्यास न कळे. बातमी लागली ती सेवेसीं लिहिली असे. कलम १

आनंदराव पवार व आनंदराव कारकून हे उभयतां बाजीराव बर्वे यांचे घरी घेऊन, मेजवानी घेऊन, दोघांस शेलेपागोटी देऊन रवाना केले. ते बाईंस भेटले नाहींत. यांस भेटून पाटीलबावांकडे गेले. कलम १

त्यांची रवानगी जालीयावर मागाहून महिपतराव यांचे बंधु शामराव व मल्हार नाईक क्षीरसागर उज्जनीस राहतात ते, ऐसे दादासाहेबांकडून येथें आले. त्यांची भेट बाजीराव यांची जाली. त्यास सामान पालखी वगैरे मल्हार नाईकांस बसायास देऊन, त्यांचे हातें राजकारण करविलें. कलम १

श्रीमंत राजश्री बाजीराव रघुनाथ व त्यांची दिवाणगिरी बाजीराव बर्वे यांचे नांवें श्रीमंतीं दिलीच आहे. त्याप्रमाणें पाटीलबावांसीं बोलून त्याचा करार करून घेतील, हें खरें ऐकिलें तें लिहिलें. कलम १

मशारनिल्हेंची मर्जी पुणीयास येऊन शुद्धपणें राहावें हें मानस सर्वथा नाहीं. लौकिकीं मात्र दाखवितात, येथें बाईंजवळ आहेत. बाईंस हें वर्तमान कळलें न कळलें, याचा शोध लागत नाही. शोधांत आहे. शोध लाऊन लिहितों. फंदांत आहेत. चाळीस पन्नासपावेतों राऊत आहेत. ते खरगोणास चाकरीस ठेविले आहेत. त्यापैकीं घरचे राऊत १५ पावेतों आहेत. पागा जळाली ती त्यांची जळाली. सरकारचे हुजूरपागेपैकीं घोडीं अकरा बारा वाचलीं. हे वर्तमान खरें. कलम १

सदरहूप्रमाणें ऐकिलें तें सेवेसीं लिहिलें असे. बहुत काय लिहिणें, लोभ करावा हे विज्ञापना.''

---

## लेखांक १४३

**श्री** ता. १५ मार्च, इ. स. १७८३

''सेवेसीं विनंतिं सेवक केसी भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ ११ माहे रविलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष : तिलोकसी पदमसी याचें कर्ज येथील खर्चासाठी घेतलें. राजश्री कृष्णाजी नाईक थत्ते यांचा ऐवज घेतला. त्यास सबुरी आहे. जोंवर त्यांचा ऐवज येथें वसूल जाला, तोंवर सोय पडली. नाहीं तेव्हां, मारवाड प्रांतींचे सावकार येथें आहेत, त्यांची दुकाने पुण्यांत आहेत; येथील दुकानदारांपासोन आज दीड वर्षांत रुपये १५०० घेतले. दिपवाळीस खातें बरोबर जालें नाहीं. त्यांनीं तगादा केला. तेव्हां त्यांच्या ऐवजासाठीं आणि एक दोन स्थळीं विचारून पाहिलें. कोठें सोय पडेना. राजश्री कृष्णाजी नाईक थत्ते यांजवर चिटी (=चिठ्ठी) करावी, तर पहिलाच ऐवज त्यांचा दिला नाहीं. चिटी केलीयास माघारें चिठ्ठी फिरवितील म्हणोन चिंता! स्वामी धनी, मायबाप. आपणावर चिटी करावी, परंतु सूचना विनंति केली नसता चिटी करतां न ये. सावकार चिटी मागत होता. परंतु त्यांसी मुदत एका महिन्याची करून सेवेसीं सूचनार्थ विज्ञापना लिहिली. आज्ञा आलियावर त्यांस चिटी लिहून देऊन त्यांचा निर्गम करीन. एका मासाचा वायदा केला आहे. मुदत जालीयावर चिटी सावकारांस लिहून देणें प्राप्त. दुसरा इलाज नाही. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.''

---

## लेखांक १४४

पै छ २८ रविलाखर सलास, फाल्गुन मास **श्री** ता. १९ मार्च, इ. स. १७८३

''श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं :

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १५ रविलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष : हल्लीं सरकारचे पत्र बाईंस आले, त्यावरून बाईंनीं वाफगांवास पत्र राजश्री तुकोजी होळकर यांस लिहिलें कीं, ऐवज कोठून द्यावयाचा? आम्हांसीं उत्तर करितात कीं ऐवज मजपासीं नाहीं. वरचेवर गोष्टी सांगतात. ठिकाण लागूं देत नाही. दोन चार वेळ विनंति केली कीं, ऐवज लग्नाचे उत्सवाचा आहे, द्यावयास संतोष असावा. आम्हांजवळ खुलासा निघत नाहीं. तेव्हां राजश्री कृष्णाजी तानदेव येथें खरगोणाहून महतपुरास जावयास आले. त्यांजपासीं खुलासा बाई बोलली कीं, दोन लक्षांची वरात श्रीमंती चिरंजीवाची वाफगांवींहून पाठविली, तो ऐवज देणें आहे.

परंतु दोन महिने जाबसालांत लाऊन, पुढील साल आईदेचें ऐवजीं महालसंबंधें ऐवज घेऊन देईन ज्येष्ठ अखेरीस. याप्रमाणें राजश्री कृष्णाजीपंतांनीं सांगितलें कीं तुम्हीं निकड

न करावी. बाईंसी बोलणें जाले. ऐवज दोन लक्षांचा, वाफगांवचे उत्तर कसे येतें त्यासारखें करून देतील. याप्रमाणें ऐकिलें तें सेवेसीं लिहिलें असे. येथें धरणीकंप फाल्गुन शुद्ध १२ शनिवारीं जाला. तृतीय प्रहरीं अर्ध घटिका जाला. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.''

---

## लेखांक १४५

**श्री** इ. स. १७८३

''सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजे : श्रीमंत राजश्री दादासाहेबांकडून बाजीराव बर्वे महेश्वरीं आले. तेव्हां येतेसमयीं, राजश्री बाजीराव रघुनाथ यांची दिवाणगिरी करार करून, दादासाहेबांपासून शिरपांव घेऊन आले. येथें आलियावर घोडीं पिडीं जळालीं. नुकसानी फार जाली. कांहीं जवाहीर वगैरे होतें तें जळालें. मग फौज ठेवावयाची सोय घडली नाही. बाईंजवळ होते. येथें पुरता विश्वास दाखऊन पुन्हां दादासाहेबांकडे पत्रें पाठविलीं. त्यांजकडून राजश्री आनंदराव पवार व आनंदराव कारकून श्रीगोंदेकर उभयतां येथें आले. त्यांनीं पत्रें दादासाहेबांची पाटीलबावांचे नांवें आणली. ती बाजीराव यांस दाखविलीं. येथून यांनीं आपलें पत्र लिहिलें. पाटीलबावांकडे आनंदराव पवार यांस पाठविलें. त्यातील बारीक शोध याप्रमाणें लागला. ती सेवेसीं लिहिला आहे. त्यावरून श्रवण होईल. हे विज्ञापना.''

---

## लेखांक १४६

**श्री** एप्रिल, इ. स. १७८३

''सेवेसीं साष्टांग नमस्कार विनंति ऐसीजे : येथें वर्तमान पक्कें लागलें तें लिहिलें असे :

राजश्री शुद्धपणें तेथें येऊन, श्रीमंत राजश्री पंतप्रधान साहेबांचे चरणांसीं रूजूं राहणार म्हणून आपणासीं मध्यस्त (=मध्यस्थ) बोलतात, तें रावजींचे अनुमतें नाहीं. त्याचें कारण असें ऐकिलें कीं, रावजींची थोरली स्त्री, तिजपाशीं अनाजी लक्ष्मण कोण आहे, त्यानें तिचें साधन करून, तिजकडून रावजींचे नांवें पत्रें तेथेंच लिहिलीं. त्याचें जाब येथें आल्यावर रावजी संतप्त जाले. हें कोणें करविलें? आम्हांस जावयाचें नाहीं. पत्रें तों आली. लाचार म्हणून बाईंशीं बोलून, बाईंचीं पत्रें येथून पाठविलीं. जें करणे तें तेथून होते. अनाजी लक्ष्मण याचे बंधु, गोविंद लक्ष्मण, येथें येऊन रावजींसीं बोलून, बाईंचीं पत्रें घेऊन कारकून पुण्यास आला. त्यास पंधरा दिवस जाले, आला असेल. तेथून मध्यस्ताचे लखोटे डाकेवरून दोन

रावजींस आले. त्याचा आशय समजला नाही. कलम १

रावजीसमागमें जरीपटका व मुतालकी शिक्के दादासाहेबांनीं दिले, ते बरोबरच घेऊन आले आहेत. कलम १

रावजींचा मजकूर बाईंसीं बोलावयाचा आहे, म्हणजे बाईंचा खुलासा काय तो कळेल. परंतु बाईंसीं बोलावें न बोलावें याची आज्ञा आल्यावर, बोलून उत्तर होईल तें लिहीन. कलम १

बाईंची चित्तवृत्ती, आज सहा महिने जाले, ऐक्यास आणण्यास करितों, परंतु घडत नाहीं. समागमें कोणी कारभारी शहाणा नाहीं. स्त्रीचा स्वभाव. यासी साधन हलके तऱ्हेनें करावें, तर तें ठीक नाही. पुढें घडेल तें खरें. कलम १

रावजींचे मनात, दादासाहेब झांशीस जातात या अर्थे, आपण बाईंचे कैदेंत किल्ल्यांत आहेत, तर हें ठीक नाही. हें स्थळ पुरत नाही हें मिस करून, किल्ल्यांतून निघोन बाहेर शहरपन्ह्यांत राहावें ऐसें आहे. जे समयीं बाईंशीं बोलतील ते समयीं बाईंस सूचना करीन, कीं यांस किल्ल्याबाहेर राहावयास सांगूं नये. येथेंच राहाणें ऐसी सूचना करीन. मग बाईंनीं ऐकिलें तर उत्तम. एकदोन वेळ सांगून किल्ल्यांतून बाहेर न जात ऐसें करीन. बाईंजवळ एकांत समय फावणें कठीण. गोष्ट फुटली तर वाईट. यास्तव उगाच आहे. हे जाऊंच लागतील तेव्हां एकांतीं गांठ पाडून सांगणें प्राप्त. तोंवर आपली आज्ञा येईल तसे करूं. कलम १

बाईंस आम्ही कांहीं बोलावयासी गेलों म्हणजे मर्जीच ठीक पडत नाही. कदाचित रावजींचें वर्तमान सांगितल्यावर जातीनें शुद्ध असली तरी ऐकून बंदोबस्त करितील. नसली शुद्ध तर ऐकून उगीच राहतील. यावरून त्यांचे मानस काय ते समजेल. कलम १

सदरहू सहा कलमें सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.''

---

## लेखांक १४७

**श्री** ता. २० एप्रिल, इ. स. १७८३

''सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १७ माहे जमादिलावलपावेतों सेवकाचे वर्तमान यथास्थित असे. छ २५ मोहरमचें आज्ञापत्र आलें, त्या दिवसापासोन बाईंसीं बोलत असतां आज उत्तर देतें, उद्यां देतें. मधें मधें हेंही बोलणें कीं, राजश्री महादजी शिंदे यांजकडून उत्तर आल्यावर उत्तर लिहून देईन. बहुत दिवस जाले, जासूद बसले आहेत; समय मसलतीचा; आपला उपयोग लिहिल्याप्रमाणें पडावा म्हणत गेलों. तेव्हां त्रासरूप मर्जी होऊन उत्तर बोलत गेली कीं, ऐवज नाही म्हणाल तर उत्तर देईन. अथवा पाटीलबावांचे जाब येऊं द्या,

मग उत्तर देईन. ऐसें करितां पाटीलबावांची पत्रें बाईंस आलीं व वाफगांवासही गेली. त्यातील अर्थ समजण्यांत आले नाहींत. ऐसें लांबणीवर घालून हल्लीं निखालसपणें पत्राचें उत्तर लिहून दिल्हें, तें बजिन्नस पाठविलें आहे. साडेतीन महिने जाबसालाखालें घालून शेवटीं हें पत्र लिहून दिल्हें. तेव्हां बाईंस विचारलें कीं, आपलें म्हणणें हें होतें कीं, पाटीलबावांचे उत्तर आल्यावर काय सांगणें ते सांगूं; त्याचें फल हेंच कीं काय? त्यास उत्तर दिलें कीं, वाफगांवास पत्रें गेली, त्यांची उत्तरे पाटीलबावांकडे गेली. आमचा जाब हे पत्र लिहून दिल्हें. सावकार व घेणार तेथेंच आहेत. ऐसी उत्तरें होतात. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.''

---

## लेखांक १४८

**श्री** ता. २४ एप्रिल, इ. स. १७८३

''सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजे :

चंद्र ९ जमादिलावलचें पुरवणीपत्र छ २१ माहे मिनहूस पावलें. पत्री आज्ञा कीं, आनंदराव पवार व महिपतराव यांचे बंधु हे महेश्वरीं आले, यांची भेट बाईंसीं जाली व बोलणें काय जाले व बाजीरायास भेटून यांसीं काय बोलणें जालें, याचा बारीक रीतीनें शोध करून लिहिणें म्हणून आज्ञा. त्यावरून कांहीं कळलें, ते सविस्तर वेगळीं पत्रें लिहिलीं आहेत, त्यावरून कळेल. राजश्री बाजीराव यांनीं श्रीमंत राजश्री दादासाहेबांस पत्र पाठविलें कीं, पाटीलबावांजवळून सर्व प्रकारें खातरजमा करून घेतली. हरी बाबाजी मारला, तो चित्तात किंतु पाटीलबावांचे होता. त्यांचें निवारण केले. पाटीलबावांचीं पत्रें तुमचे व आमचे नांवें खातरजमेचीं आलीं, तर तुम्ही बेवसवास झांशीस येणें. तुम्ही, आम्ही व पाटीलबावा एकत्र जालियावर जी मसलत करणें ती करूं. याप्रमाणें रावजींनीं पत्रें सांप्रत श्रीमंतांकडे सुरतेस पाठविलीं आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.''

---

## लेखांक १४९

**श्री** ता. २७ एप्रिल, इ. स. १७८३

''श्रीमंत राजश्री बाबासाहेब स्वामींचे सेवेसीं : विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजे, तागाईत छ २४ माहे

जमादिलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. छ ९ जमादिलावलीचें पत्र पाठविलें, ते येथें छ २१ माहे मिनहूस दो घटका रात्रीस डाकेसमागमें पावले. पत्राचे अन्वयें बाईंसीं बहुत बोललों. हा ऐवज लौकर रवाना करावा, यांत सर्वोपरी चांगलें. परंतु बाईंचें एकच ध्यान कीं, वाफगांवचें उत्तर आलें नाही. आम्हीं उत्तर दिल्हें कीं, वाफगांवचा जाब आपणास आला. आमची बातमी आहे. त्यावरून बाई म्हणाली कीं, पत्र आलें म्हणजे तुम्हांस सांगून मग काय करणें तसें ऐवजाची सोय करूं. तूर्त पत्र येऊं द्या. याप्रमाणें जाबसाल जाला. सेवेसीं श्रुत होय. हे पत्रलगतां लखोटा घ्यावा हे विज्ञापना.''

---

## लेखांक १५०

**श्री** ता. २७ एप्रिल, इ. स. १७८३

''सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजे : मागाहून वरात दोन लक्षांची पाठविली, ती वरात व राजश्री तुकोजी होळकर सुभेदार यांचें पत्र बाईंस दिल्हें. त्यांणीं पत्राच्या नकला करून व आपलें पत्र, ऐसे वाफगांवांस पाठविलें. तेथून उत्तर आलियावर काय सांगणें ते सांगूं म्हणून बोलली. हें वर्तमान डाकेबरोबर लिहून पाठविलें. अलीकडे फार दिवस जाले; जासूदजोडी बसली; निकड करितात; ऐवज द्यावा; म्हणोन बोलणें जालें. त्याचें उत्तर हेंच कीं, वाफगांवचे जाब आलीयाखरीज होत नाही. तर वाफगांवांस सांडणी स्वार अथवा जलद जासूदजोडी पाठवावी. उत्तर काय ते लौकर आणवावें म्हणोन बोलत असतां, मर्जी दिक होऊन उत्तर दिल्हें कीं, घेणार व देणार उभयतां तेथेंच आहेत. मजकडे गुंता काय? ऐसें म्हणतात. राजश्री पाटीलबावांचा कबिला देशींहून त्यांजकडे जावयास, मर्दानाचे घाटें नर्मदा उतरून काल करईस आले. येथून बाईंनीं त्यांस भेटीस बोलाविलें आहे. आलियावर वर्तमान होईल ते लिहूं. त्याजबरोबर राजश्री देवजी गवळी कांहीं जाबसालनिमित्य मामलतीचे, बाईंकडे कालच आले. बाईंची त्यांची भेट जाली. पुढें कबिल्याबरोबर जातील किंवा माघारे अशेरीस जातील, हे कळलीयावर सेवेसीं लिहीन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.''

---

## लेखांक १५१

**श्री** ता. १ मे, इ. स. १७८३

''सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत

छ २८ माहे जमादिलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. येथील पूर्वी जाबसाल जाल्याचें उत्तर बाईंनीं दिलें. ते जोडी सरकारची येथून रवाना केली. छ १८ सोमवार माहे मिनहूस तद्नंतरआज्ञापत्र छ ९ मिनहूचें ते छ २१ मिनहूस पावलें. त्याची प्रत्योत्तरें, येथून सरकारची कासदजोडी सागर प्रांतीं गेली होती, ते येथें आली; त्या जोडीबरोबर छ २४ जमादिलावलीं रविवारीं पावली, ते पावतील. अलीकडील वर्तमान, बाईंकडील जोडी आली. मोहनच्या राजाकडे बातमीसाठीं गेली होती, की श्रीमंत राजश्री दादासाहेब झाशी प्रांतीं येतात, त्यास सुरतेत येविषयींची तयारी व पक्कें वर्तमान लिहावें. त्यावरून अलीमोहनचें राजाचें पत्र आले. त्या पत्रींचा मजकूर कीं, स्वारीची तयारी नाही व आवाई ऐकितो. विशेष कांहीं तसें असल्यास आपले बातमीची जोडी कशास? मीच वर्तमान लिहीन. याप्रमाणें पत्र होते. कारकुनांनीं बाईंजवळ वाचलें, तें ऐकिलें. सेवेसीं लिहिलें असे. राजश्री मुकुंदराव दिवाण यांचे जबानीचे वर्तमान कीं, राजश्री केसोपंत पाटीलबावांकडून श्रीमंतांकडे सुरतेस गेले. त्यांचें बोलणें होऊन पत्रें माघारीं पाटीलबावांकडे जातील. त्याचीं उत्तरें फिरून श्रीमंतांस जातील. तेव्हां तह काय ठरणें तो ठरेल. हें ऐकिलें. त्यांनींच रूबरू याप्रमाणें सांगितलें, तें लिहिलें असे. राजश्री बाजीराव बर्वे घर किल्ल्याबाहेर मागणार हें वर्तमान छ २४ जमादिलावलचे पत्रीं लिहिलें होतें. तो परस्परें वर्तमान ऐकिलें कीं, राऊजी बाईजवळ बाहेर जागा मागतात. हें छ २६ कळलें. मग छ २७ स प्रातःकाळीं कोणी कारकून मंडळी नसती, त्या समयीं जाऊन सूचना केली. राजश्री बाजीराव बाहेर जागा मागतील तर न द्यावी. ऐकून उत्तर दिले कीं कां? मीं उत्तर दिलें कीं, तुम्ही दौलत करितात. तुम्हांस विदित असेल. हे ऐकून बाई बोलली कीं, खरेंच, जागा मागांवयास आले होते. परंतु मीं कबूल केलें नाहीं. तुम्हीं सूचना केली याचें कारण कळों द्यावें. त्यांचें उत्तर दिलें कीं, ''समयसार तुम्हांसीं बोलणें. तूर्त समय नाहीं. तुमचें आमचें कधी खलबत होत नाहीं. लोकांस संशय पडेल.'' इतकें सांगून घरास आलों. राऊजींचे शोधांत पक्केपणें एक दोन जणांसीं लावून ठेविले आहेत. तूर्त बाहेर स्थळ रहावयास बाईंनीं न द्यावें, याप्रमाणें जालें. किल्ल्यांत त्यांनीं असावें. याउपरी वर्तमान होईल तें सेवेसीं लिहीत जाईन. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विज्ञापना.''

---

## लेखांक १५२

**श्री** ता. ५ मे, इ. स. १७८३

''सेवेसीं आज्ञांकिताचा कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ ३ जमादिलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष : राजश्री बाजीराव बर्वे वैशाख

शुद्ध २ शनिवारीं दीपसमयीं माझे बिऱ्हाडास आले. मी घरींच होतो. बरोबर पांच सात माणसें व आपण आले. मी दरवाजापावेतों सामोरा जाऊन घरांत आणलें. येऊन बसले. त्यांचीं माणसें, आमचीं माणसें, दूर त्यांणीं करून, मी व ते ऐसे उभयतां बसलों. तदनंतर प्रथम मी बोललो कीं, आज कोणीकडे दया केली, कीं येऊन आमचा परामर्ष केला. ऐकून त्यांणीं उत्तर दिले कीं, तुम्ही आम्ही कोणी परकी नाही. रेवेस संध्येस गेलों, तिकडून तुझ्यांकडे आलो. हें उत्तर त्यांणीं केले. मग तेच बोलूं लागले. तेंच लिहिलें असे.

श्रीमंत राजश्री दादासाहेब आनंदवल्लीस जातात. राजश्री बाजीराव यांणीं श्रीमंत राजश्री रावसाहेबांजवळ जावें, याप्रमाणें वर्तमान अलीकडे ऐकतों. कलम १

आमचा मानस पुणियास जावें, परंतु आम्हांसांगातें सरंजाम नाहीं. आम्हीं विनंति लिहिली आहे. कांहीं पागेचीं घोडीं आम्हांस द्यावीं. आमचे स्वरूपानें नेलियास उत्तम. कलम १

आम्ही दादासाहेबांपासून निघालों, ते समयीं दादासाहेबांनीं अहिल्याबाईंस एक पत्र व राजश्री महादजी शिंदे यांस पत्र दिलें. ती पत्रें आम्हीं बाईंस व पाटीलबावांस दिली नाहींत. आमचे मानस दादासाहेबांचे सोबतीस राहावयाचें नाहीं. त्यांचे मनोधारणास पत्रें घेतलीं. येथें येऊन स्वस्थ बसलों. फार करून मानस राजश्री नानांजवळ असावें. कृपा करितील. दीर्घ द्वेष त्यांचे ठिकाणीं नाहीं. कलम १

येथें आलो तेव्हां घोडीं पिढी दौलत चांगली होती, ते जळाली, वस्त्र देखील राहिलें नाही. कर्जदार जालों. कलम १

आजपावेतों श्रीमंत राजश्री रावसाहेबांचे चरणाजवळ असतों, तर फार करून ऊर्जित होतें. सांप्रत दुसरे ठिकाणी जावें, हे इच्छा सर्वथा नाहीं. कलम १

सदरहू ११ कलमें ह्यांचें बोलणें. कलम १

मी उत्तर दिल्हें कीं, आपण मजकूर केला, यास मीही माहीत थोडा बहुत आहें. इतक्या कलमांत मजला एक गोष्ट विदित नाहीं. परंतु मिथ्या बोललों कीं, माहीत थोडा बहुत आहे. कलम १

रावजींची खातर इतक्या उत्तराचें एक उत्तर दिलें कीं, श्रीमंत राजश्री दादासाहेब पुणियास गेलियावर सहजच तुमचे दोष दूर होऊन श्रीमंत कृपा करितील. चिंता न करावी. कलम १

झांशीस जात नाहींत हें फार चांगलें. कलह तुटला. कलम १

आम्ही येथें येऊन दीड वर्ष जालें, एकनिष्ठपणें आहोंत. सरकारचें म्हणणें हें होतें कीं, एक संवत्सर उगेंच असावे. तदनंतर स्वरूपानशीं येऊं. कलम १

श्रीमंत राजश्री दादासाहेब अखंड राजश्री नानांचे व हरिपंततात्यांचे गुण घेतात कीं, कारभारी आमचे दौलतींत असे होते कीं, त्यांनीं राज्य रक्षिलें. सदैव उभयतांचे नांवें मजकूर जाला तर श्रीमंतीं बरेंच म्हटलें. सखारामपंत व आबाजी महादेव व चिंतो विठ्ठल वगैरे

यांस दोष ठेवीत आहेत. ते अप्रामाणिक. उभयतांचे सद्‌गुण घेतात. कलम १

शिंदे होळकर यांणीं वांचविले, हें दादासाहेब म्हणत असतात. कलम १

बाईनीं दीड वर्षात तीन साडेतीन हजारपावेतों खर्चास दिले. दोन तीन कर्ज घेऊन खाल्ले. ही दशा जाली ! कलम १

हैदरखानाकडे होतों, तेथें फंदफितूर न करितां राहून, एक वेळ दादासाहेबांची भेट घेऊन मग पुणियास जावें. वचन दादासाहेबांजवळ गुंतले होते, म्हणून सुरापूरकर आग्रह करीत असतां तेथें न राहून सुरतेस गेलो. वचन मोकळे करून पुणियास जावयाकरितां येथें आलों. कलम १

तुम्हांस डाकेबरोबर लखोटा आला, तो श्रीमंतीं लिहिला होता कीं मध्यस्ताचें पत्र होते? त्याचे उत्तर रावजींनीं दिलें कीं, राजश्री गोविंदतात्यांचें पत्र होते. त्यांनीं लिहिले होतें कीं, तुमचें येणें होत नाहीं. पुढें पर्जन्यकाळ आला. त्याचे उत्तर आम्हीं पाठविले आहे. उत्तर आलें म्हणजे जाऊं. याप्रमाणें सांगितलें. कलम १

टिपूची तारीफ फार केली कीं, दौलती मोठे खानामागें दौलत राखील.

कलम १

याप्रमाणेंच बोलणें जाले, ते सेवेसीं लिहिले. पानदान आणोन मशारनिल्हेची मुदारत केली. वस्त्रें संग्रहीं नाहींत कीं द्यावीं. बाजारांतून आणावयाची सोय नाही. मग पानदान आणून रूखसत केले. सेवेसीं श्रुत होय ही विज्ञापना.''

---

## लेखांक १५३

पौ.छ. १५ जमादिलाखर सलास **श्री गजानन** ता. ५ मे, इ. स. १७८३

''सेवेसीं केसो भिकाजी दातार व विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ. ३ जमादिलाखरपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेष : इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून, कासीद व जासूद जोडीबरोबर पत्रें रवाना केली आहेत. सांप्रतचे वर्तमान, राजश्री पाटीलबावांच्या लष्करातून चैत्र शुद्ध १४ चीं कोणी गृहस्थाचीं पत्रें रवाना जालीं. ते वद्य चतुर्दशीस येथें पावली. त्यांत वर्तमान कीं, पाटीलबावांनीं बावनबुरजी गढी घेऊन तेथून कुच करून ग्वाल्हेरीस आले. किल्ल्याभोंवतालें मोर्चेबंदी करून शहरपन्ह्यांतून पूर्वेकडून दरवाजाशीं मोर्चे लाविले. तोफ लावून पन्नास हात किल्ल्याची मुंढे लडाऊन दिली. एक बावडीचें पाणी किल्ल्यांत होते, तें पाणी बंद केलें. खासा मोर्च्यात जात असतात. त्रयोदशीस हल्ला करून किल्ल्याचे तीन दरवाजे घेतले. दोन दरवाजे वरते राहिले आहेत. किल्ल्यावरील शिबंदीचे लोक गडबडले आहेत. किल्लाही लवकरीच हस्तगत होईल.

म्हणून त्या गृहस्थानें लिहिलें होतें. भोपाळवाले पठाण पेशजीं येथें आले होते. बाईंशीं येथें करारमदार करून गेले. तो तपशील पेशजीं विनंतिपत्रीं लिहिलाच आहे. त्यास त्या पठाणांनीं आपले कबिले इंदुरांत आणून ठेविले. तदोत्तर कांहीं खर्चावेचाची बेगमी करावी म्हणून जमियतेनिशीं भोपाळच्या तालुक्याचा मातबर गांव मारावयास गेले. ते वर्तमान भोपाळवाल्यास कळलें. त्यांनीही तेथून हजार पठाण पाठविलें. त्यांनीं येऊन त्या गांवाजवळ दबा धरला होता. हेही इकडून पांच सहाशें पठाण गांवावर गेले. मध्यें त्यांनीं दबा धरला होता. त्यांसीं यांसीं गांठ पडून झटपट जाली. पहिल्यानें यांनीं त्यांचा मोड केला. ते निघून चालले. यांनीं कोसभर पाठलाग केला. त्यांनीं माघारी उलटून यांचा मोड केला. दोन चारशें माणूस उभयपक्षीं कामास आले. हे पांच भाऊ होते, त्यापैकीं चौघे लढाईत कामास आले. एकास जखमा लागल्या. उचलून नेला. याप्रमाणें येथें वर्तमान आलें. पेशजीं आज्ञापत्रीं आज्ञा आली जें, लग्नपट्टीच्या दोन लक्ष रुपयांविषयीं बाईंनीं तुकोजीबावांच्या पत्राचा आक्षेप केला आहे. त्यास येथून तुकोजी होळकर यांनीं बाईंस पत्र पाठविलें आहे. तुम्हीं बाईंशीं बोलून वरातीप्रमाणे ऐवजाची तरतूद करवून ऐवज लवकर पाठवणें. त्यास येथें बाईंस विचारले. त्यांनीं उत्तर केलें जें, अद्याप त्यांचें पत्र आलें नाहीं. राजश्री कृष्णाजी बहिरव थत्ते यांस लिहिलें, ते पत्र फोडून जरूर पहावें. बहुत काय लिहिणें, लोभ करावा हे विज्ञप्ति.''

---

## लेखांक १५४

**श्री** मे, इ. स. १७८३

''सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक शिरसाष्टांग नमस्कार विनंति. राजश्री पाटीलबावा ग्वाल्हेरजवळ होते. तेथून बावनबुर्जी गढी गोहदवाले यांची होती. त्या गढीस जाऊन मोर्चे लाविले. ते गढी घेतली. तेथून शह गोहदेवर आहे. ग्वाल्हेरी किल्ला हा कालवर खाली जाला नाही. परंतु होईल. यांनी आड घातली कीं, गोहद घेऊन मग ग्वाल्हेर घेऊं. याप्रमाणें वर्तमान ऐकिले. पाटीलबावांजवळ गोसावी व बैरागी चाकरीस होते, ते दूर केलें. त्यांचा जमाव सात आठ हजार आहेत. बरोबर सामान लढाईचें आहे. त्यांनीं महालोमहालची खंडणी घेत उज्जनीपलीकडे आले. उज्जनीस येणार म्हणोन वर्तमान ऐकिले. इंग्रजाचा तह जाला. श्रीमंत राजश्री दादासाहेब यास आणावयास राजश्री केसो अनंत राजश्री पाटीलबावांकडून गेले. ते बाबापिराचे घाटावर जाणार. तिकडून दादासाहेब बडोदे येथपावेतों आले, म्हणोन ऐकिलें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.''

---

# लेखांक १५५

**श्री गजानन** ता. १७ मे, इ. स. १७८३

''सेवेसीं केसो भिकाजी दातार व विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १५ जमादिलाखरपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असो. विशेष : सरकारचें आज्ञापत्र छ २२ जमादिलावलचें आलें, ते छ ७ जमादिलाखरीं येथें पावलें. पत्र पाहून तेच समयीं दरबारास जाऊन बाईंस वाचून दाखविले. ते समयीं येथील कारभारीही जवळ होते. पत्र ऐकून बाईंनीं उत्तर केलें जे, ''आम्हीं पत्र राजश्री तुकोजी होळकर यांस लिहिले आहे. त्यांचे उत्तर अद्याप आले नाही.'' आम्हीं उत्तर केलें जें, ''सरकारचे दोहीं आज्ञापत्रीं लिहिलें आलें कीं, तुकोजी होळकर यांनीं बाईंच्या पत्राचें उत्तर पाठविलें. आतां या लग्नाच्या ऐवजास बाईंनीं दिक्कत करूं नये.'' त्यास, मुत्सद्दी व बाई बोलली जें, ''पत्र येऊन आम्हीं तुम्हांस न दाखवावे असें संकट काय आहे?'' शपथपूर्वक मुत्सद्दी यांनीं सांगितले जे, ''पत्र आलें नाहीं.'' तेव्हां यांचें खरें किंवा तुकोजी होळकरांनीं पत्र पाठविलें म्हणून सरकारांत विनंति केली आहे तें खरें म्हणावें? काल बाईंचीं व सेवकाचीं ऐवजाकरितां निक्षूनच बोलणीं पुष्कळ जालीं. आम्हीं उत्तरें केलीं जें, ''आपण म्हणतात जे, तुकोजीबावांस बाकीविषयीं पत्र लिहिलें आहे, ते कोणती बाकी लिहितात तें पाहून तुम्हासी बोलणें तें बोलूं, असें आपले बोलणें. तुकोजीबावांस पत्र आपण लिहिल्यास दोन अडीच महिने जाले, अद्याप उत्तर आलें नाहीं म्हणतां? आम्हांस तों सरकारची आज्ञापत्रें अशीं येतात. त्यांत प्रमाण अप्रमाण कोणतें म्हणावें?'' त्यास बाई बोलली जे, ''एवढ्या ऐवजासाठीं आम्ही तुम्हांसीं अप्रमाण बोलावें, असें आम्हांस संकट काय आहे? श्रीमंतांच्या लग्नाचा ऐवज आम्हीं संतोषाने द्यावा. परंतु तुम्हांस पत्र लिहिलें, त्याचेंही उत्तर नाही व श्रीमंतांचेही आम्हांस दुसरें पत्र नाहीं. तुम्हांस वरचेवर सरकारचीं पत्रें अशी येतात. त्या तुमच्या पत्रावरच आम्हीं ऐवज द्यावा कीं काय?'' आम्ही उत्तर केले जे, ''आपल्यास सरकारची वरातच आली असतां, दुसऱ्या पत्राचा आपण आक्षेप करणें युक्त कीं काय?'' बाई बोलली जें, ''कां न करावा? हें ऐवजाचें काम होय.'' तेव्हां आम्हीं उत्तर केलें जें, ''अशीच आपली मर्जी असल्यास आम्ही लिहितों.'' त्यास उलटून बोलली जें, ''आम्हांस तसें पत्र पाहिजे कीं, पेस्तर सालचे ऐवजीं महालपैकीं ऐवज देणे.'' ''अस्तु. असेंही आम्ही श्रीमंतांस लिहितों. तेथें तुकोजीबावा काय विनंति करणें ते करतील.'' बाई बोलली जें, ''फार चांगलें. लिहा.'' फिरून आम्ही विनंति केली जें, ''श्रीमंतांच्या लग्न उत्सवाच्या ऐवजाविषयींच इतकी भवती न भवती व्हावी हें योग्य नाही. येविषयींचें असे जाबसाल ऐकून श्रीमंतांच्या चित्तांत कसे वाटेल, हें आपण समजतच आहांत?'' बाई बोलली जे, ''केवळ त्या ऐवजास आम्हीं दिक्कत इतकी करावी, असा अर्थ नाहीं. परंतु त्यांचीच अड चालावी, आमची कां न चालावी? यांत तुम्ही काय लिहिणें

तें लिहा.'' याप्रमाणें उत्तरें प्रत्युत्तरें जालीं. यातील सारांश दिसून आले कीं, महालपैकीं पेस्तरसालचे ऐवजीं ऐवज देणें असें सरकारचें पत्र यावें, अगर तुकोजीबावांचे पत्र यावें, असा येथील मनोदय. सुरळीत पत्र सरकारचें अगर होळकरांचें यावे म्हणजे ऐवज देतील. वरात घेऊन जासूद आला त्यास फार दिवस जाले, म्हणून नित्य बोलतच होतो. त्यास बाईंनी जासुदास वरात पत्राचें उत्तर दिलें, ते सेवेसीं पत्रें देऊन जासूद पाठविला आहे. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विज्ञापना.''

## लेखांक १५६

**श्री** मे, इ. स. १७८३

''सेवेसीं साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजे : बाईंनी पत्र लिहून दिल्हें, तें खुले दिल्हें. ते समयीं मीं उत्तर केलें कीं, आपण आजपावेतों बोलत होतां, त्याचा फलादेश हा जाला ! पुढें माझी अब्रू श्रीमंत ठेवणार नाहींत. यावर श्रीमंत बहुमानाची वस्त्रें आम्हांस देतील!'' हे उत्तर केल्यावर बाईंनीं हांसल्यावर नेलें. परंतु जवळ राजश्री मुकुंदराऊ दिवाण व राजश्री विनायक बाजी होते. विनायक बाजींनीं उत्तर दिलें कीं, ''श्रीमंतांकडून येथें आला. येथून गेलीयास आचवला नाहीं.'' इतकें बोलले. मीं उत्तर दिल्हें कीं, ''ते यश घेऊन गेले. ते कशास आंचवतील? परंतु मी मात्र बाईंजवळ येऊन बाईंनीं अपेश दिल्हेंसे होतें.'' ऐसेंही उत्तरें जालीं असतां, त्यांच्या मनांत सरकारलक्षीं गोष्ट अथवा लिहिण्याचा प्रकार येऊन लिहिल्या अर्थाप्रमाणें घडावेंसें नाही. यावर जसी आज्ञा येईल, तसी वर्तणूक करूं. बरोबर सरंजाम तीनशें रुपये दरमहाचा खर्च. कार्य तर घडत नाहीं. तेव्हां शिलेदार राऊत आहेत त्यांची आज्ञा, ठेवावे कीं हुजूर रवाना करावे. खर्चास दोनशें रुपये दीडमाही देतात, ते पुरत नाहीं. दीड माही साडेतीनशें रुपये पाहिजेत. ते प्रमाण खर्च. वावगा खर्च नाहीं. ऐयीयास आज्ञा येईल तसी वर्तणूक करूं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.''

## लेखांक १५७

पैवस्ती छ ३ रजब सलास समानीन **श्री** ता. १९ मे, इ. स. १७८३

''सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति तागाईत छ १७ माहे जमादिलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष :

श्रीमंत सौभाग्यवती मातुश्री आनंदीबाईंसाहेब यांजपाशीं मकरीकर लाखीकर होता.

तो राजश्री बाजीराव बर्वे यांजसमागमें दिला होता. तो सांप्रत बाजीराव यांनीं सुरतेस पाठविला कीं, आम्हीं येथें रहावें किंवा काय करावें? श्रीमंत पुण्यास जातात किंवा झांशीस येतात, हें कसें काय तें लिहिणें. याप्रमाणें मकरीस पत्र देऊन पाठविलें आहे. कलम १

राजश्री जिऊबा शेणबाई यांजकडे राजश्री बाजीराव यांनीं पत्र पाठविलें कीं, श्रीमंतांचा निश्चय कसा पाटीलबावांनीं ठरविला, तो लिहून पाठविणें. म्हणून जासूद पत्रें घेऊन गेला.

राजश्री गणेशपंत कात्रे प्रतिनिधीकडील, त्यांचे चुलतबंधू राजश्री बाजीभट कात्रे, हे श्रीमंत राजश्री दादासाहेबांजवळ, चार मास जाले, येथूनच गेले. बाजीभटाचे मामा यज्ञेश्वर दीक्षित सप्रे येथें आहेत. त्यांस पत्र बाजीभट यांचें आलें. पत्रीं काय मजकूर तो कळला नाही. जबानींच वर्तमान कीं, तूर्त श्रीमंत राजश्री दादासाहेब येथेंच आहेत. विलायतेस पत्रें गेली आहेत. उत्तरें आल्यावर काय मसलत ठरणें ते होईल. याप्रमाणें ऐकिलें. कलम १

आम्ही सेवक. आमचे प्राणांत प्राण नाहीं. गरीब, वगवसिला कोणी नाही. एक स्वामीचरण जाणतों. चरणाखेरीज आश्रय त्रैलोक्यांत नाही. चाकरी शुद्धपणें करून आहे. कोणाची आशा धरून सरकारकामाचा शब्द येईल ती गोष्ट सहसा करीत नाही. याउपरी महाराज ठेवतील तसे राहूं. सेवकापासून आज्ञेप्रमाणें काम घडून आलें नाही म्हणून भयभीत आहें. कलम १

बाजीराव बर्वे यांची बातमी ज्या गृहस्थाकडून कळत होती, तो गृहस्थ रावजींनीं पुण्यास पाठविला. त्याजपाशीं पत्र स्वामींचें नांवें लिहून दिलें आहे. तेथील माहितगिरी त्यास आहे. विनंति करील. पुढें रावजींकडील बातमी लागांवयानिमित्य आणिक कारकून त्यांचे घरचा, तोच आपला म्हणून करून ठेविता आहे. वर्तमान कळेल तसें सेवेसीं लिहीत जाईन. कलम १

राजश्री दादो उद्धव नासिककर, यांचे चिरंजीव नारो दादाजी, पूर्वीपासून श्रीमंत राजश्री दादासाहेबांचे समागमें, ते सांप्रत येथें आले. बरोबर घोडीं २, तट्टे २ व उंट १ आहे. बाईंची भेट रोजगारास आलों म्हणून घेतली. परंतु दादासाहेब झांशीस जाणार, त्यांजबरोबर जावें म्हणून आले आहेत. कलम १

बाईंनीं दोन लक्ष रुपये द्यावे. लग्नाचा ऐवज याविषयीं मीं व राजश्री विठ्ठलपंत उभयतां बहुत म्हणून पाहिले. त्यांच्या चित्तवृत्तीस पालट होत नाहीं. वाद प्रतिवाद! ऐवजच कोठें? मजकडे तुकोजीबावांची बाकी काय आहे? आम्हीं उत्तर दिले कीं, बाकीच असावी तेव्हांच ऐवज द्यावा, नाहीं तर देऊं नये कीं काय? तर साल आइदेचे ऐवजीं तुकोजीबावांचें पत्र आणा म्हणजे देईन असे दिक्कती सांगतात. आमचा यत्न तितका भय प्रीत दाखवून, युक्तीचे वाटें बोलणें तें बोलून पाहिलें. त्यास समजतच नाहीं. चार कारभारी आहेत. त्यांसीं सांगावे तर ते बाईपेक्षां गोष्टी सांगतात. त्यांसही आगापिछा नाहीं. याप्रमाणें वर्तमान आहे. कलम १

सदरहू सात कलमें श्रुत होय हे विज्ञप्ति.''

---

महेश्वरीं यथास्थित असे. विशेष : स्वामींकडून चंद्र १ माहे मिनहूचे आज्ञापत्र सादर जाले, ते चंद्र १६ मिनहूस प्रविष्ट जालें. पत्रीं आज्ञा कीं, तुम्ही चंद्र २९ जिलकादचे व चंद्र २ जिल्हेजचे व चंद्र ८ व छ १२ मिनहूचें याप्रमाणें पत्रें पाठविलीं तीं पावलीं. राजश्री तुकोजी होळकर सुभेदार आषाढ शुद्ध १२ सीस मुहूर्तेकरून गंगाजळनिर्मळ अहिल्याबाईंचा निरोप घेऊन, नर्मदा दक्षिणतीरीं डेरे दाखल जाले, हा मजकूर वगैरे तपशिलें लिहिला तो कळला; व राजश्री देवराव यांचे लखोटे रवाना केले आहेत, म्हणून लिहिलें, तें कळलें. त्यास राजश्री तुकोजी होळकर सुभेदार मुहूर्तेकरून नर्मदा दक्षिणतीरीं आले; उत्तम गोष्ट जाली. देवराय यांची पत्रें पावलीं. पुढें होईल ते वर्तमान याप्रमाणें लिहित जाणें म्हणून पत्रीं आज्ञा. ऐसियास येथील वर्तमान अलाहिदा पत्रीं लिहिलें आहे. सरकारची पत्रें पहिले, राजश्री सुभेदार व मातुश्री बाई यांचे नांवाचीं आलीं होतीं कीं, हिंदुस्थानांतून कोणी हत्यारबंद माणूस सरकारचें दस्तकाशिवाय येऊं न द्यावे; म्हणून आज्ञा आली. त्यास, आज्ञेप्रमाणें यांनीं आपले जिल्ह्यांतील कमाविसदारांस पत्रें पाठवून, घांटा नाक्याचा बंदोबस्त करून, पत्राचे जाब लिहून दिले. त्यास राजश्री सुभेदार यांजकडील उत्तरें, राजश्री आनंदराव गंगाधर यांनीं घेऊन, परभारां रवाना केली आहेत. येथील उत्तर बजिन्नस पत्र घेऊन सेवेसीं पाठविले आहे, प्रविष्ट होईल. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.''

---

## लेखांक ३९३

**श्री** ता. २२ आगस्ट, इ. स. १७९४

''सेवेसीं विनंति सेवक कचो जनार्दन नि।। केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २५माहे मोहरम शुक्रवारपर्यंत सेवकाचें वर्तमान मुक्काम महेश्वरीं यथास्थित असे. विशेषः - येथील वर्तमान छ २० मिनहूस विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत. त्याउपर इकडील वर्तमान छ २० मोहरमीं शिलेदार लोक, बारगीर, सर्व जमा होऊन, मलई केली कीं, इंदुरीं साडेआठ माही हिशेब होऊन बाकी निघाली, त्यांत चौथाई वजा व आणखी काटकूट करितात. निमे ऐवज पदरीं पडणें कठीण. यांत सावकार देखील फिटत नाहीं. तेव्हां पुढें गत काय? असे विचार केले. कारभारी यांनीं सात आठ असामी वकलाचीं कबजें आकारून, चिठ्ठ्या सावकारावर दिल्या, त्या कांहीं फिरल्या नाहीत. ऐवज घेत गेले. पिसे शिलेदार यांनीं आपले गांवची कामें, इनामी गांव होते ते सोडून घेतले आणि वाट पाडली. तसेंच आणखी कोणाकोणास कांहीं आशा दाखवून फडशे करीत चालले. हें पाहून वरकडांनीं जमाव करून, राजश्री पाराशर दादाजी यांजकडे गेले कीं, तुम्ही आम्हांपासून चाकरी कशी घेतली आणि आतां आमचे गळे कापितात. आम्हीं पैसा

तुम्हांजवळून घेऊं, याप्रमाणें त्यांशी खटखट केली. त्यांचीं उत्तरें साफ होत गेलीं, माझें कांहीं चालत नाहीं. नवे कारभारी जाले आहेत, त्यांजकडे जावें; अथवा चित्तास पडेल तें करावें. मजला बदनाम करूं नये. अशी उत्तरें त्यांची ऐकून शिलेदार जमावानशीं नावेंवर येऊन, नावाड्यास मारहाण करून, नावेंत बसून, रेवा उतरून, सरदारांकडे जाऊन, त्यांचे डेऱ्याभवते पाळा घालून, बसले आहेत. पांचशें बारगीर जमा आहेत. इकडे बाईंनीं नावेंची चौकशी करून, नावा बंद केल्या. एक घोळका पहिले उतरून गेला. बाकी कोणी कोणते घाटें उतरून जाऊन जमा जाले. भोईटे शिलेदार जमा होऊन रात्रीस मंडलेश्वराचे घाटानें जात होते, त्यांजवर बाईंनीं चौकी पाठवून बसविले आहेत. जामीन मागतात. या प्रकारें लोकांचा गवगवा आहे. सरकारीं पत्रें राजश्री देवराव यांचे नांवें लखोटा एक व राजश्री आनंदराव गंगाधर यांचे नांवें एक, एकूण दोन लखोटे छ १२ मिनहूची रवानगी, येथें छ २० मिनहूस बारावे घटकेस पावले. उभयतांचे लखोटे पावते केले. देवराव यांचे लखोट्यांत सरदारांचे नांवची सरकारची चार पत्रें व त्यांचे नांवची चार, याप्रमाणें होती. त्यांतील मजकूर, पेंढारी देशीं न्यावयाविसीं व तुम्ही सत्वर कूच करून यावें म्हणोन होता. त्यावरून देवराव हे मातुश्री बाईंकडे येऊन वर्तमान सांगितलें कीं, सरकारचीं पत्रें याप्रमाणें आलीं आहेत, काय आज्ञा? त्याचे उत्तर बाईंनीं केलें कीं, तुम्हीं व राजश्री रामराव आपाजी, उभयतांनीं चिरंजीवाकडे जाऊन, पत्रें दाखवून व तुम्हीं बोलून कूच करवावे; शिलेदार तेथें जमा जाले आहेत, त्यांस चार गोष्टी सागाव्या. त्यावरून हे उभयतां, राजश्री देवराव व रामराय, छ २२ मिनहूस मंगळवारीं राजश्री सुभेदारांकडे, मौजे ब्राह्मणग्राचे मुक्कामीं गेले. भेट घेऊन पत्रें सरकारचीं वाचून दाखविलीं व देवराव आणखी थोडेंसें बोललें कीं, सुभेदार सरकारचाकरीस येत नसले तर, येथें पंधरा हजार फौज ठेऊन पैक्याच्या वराता त्यांजवर करूं. पैसा द्यावा लागेल; हे विचारून लिहून पाठविणें, त्याप्रमाणें केले जाईल; असें श्रीमंतांनीं माझे पत्रीं लिहिलें आहे. याचें उत्तर काय लिहूं ? तेव्हां सुभेदारांनीं उत्तर केलें कीं, कांहीं इतके नको. पागा, शागीर्दपेशा व गाडद या तीन वकलांचा बंदोबस्त जाला म्हणजे दरकूच चाललों. मजकडे गुंता कांहीं नाही. याप्रमाणें तुम्ही बाईंस व कारभारी यांस सांगून, तूर्त तीन वकलांचा पैसा आधीं देवावा. या मुक्कामींहून एक दो रोजांत कूच करितों. असें बोलणें होऊन, शिलेदारांशीं चार घटकांपर्यंत बोललें कीं, जशी वाट पडली आहे, तसा पैसा तुम्हीं घ्यावा; अधिक मिळणार नाहीं. लटकी दिक्कत न करावी. सरदारांस कूच करूं न द्याल, तर सरकारचे निमित्य तुमचे माथां येईल. दोन लक्ष रुपये दरमहा खर्च लागतो, हा तुम्हांस देणें येईल. याप्रमाणें चार गोष्टी गरमनरम सांगून सरदाराचा निरोप घेऊन सायंकाळीं येथें आले. वर्तमान बाईंजवळ सांगून आपले घरास गेले. छ २३ रोज बुधवारीं देवराय बाईंकडे आले. कारभारी सर्व होते. शागीर्दपेशा, पागा व गाडद दुदरनेक फराशीस या तिघा वकीलांचा पैसा झाडून द्यावा असें ठरलें. पेंढारीयांचा मजकूर बोलणें वरचेवर जालें. बाईंचें व कारभारी यांचे चित्तांत कीं, पेंढारी तिकडे नेऊं नयेत. ते सुधे आळ्यांत राहणार नाहींत. स्वदेशाचा कारभार उपद्रव देतील. मागतीं पंचायती कराव्या

लागतील, याप्रमाणें बोलणी जाली. परंतु देवराव यांचे म्हणणें कीं, त्यांस पत्र पाठवून त्यांतील कारभारी धेडेकरी बोलावून आणावें. त्यांचें बोलणें केसें पडतें त्याप्रमाणें आम्हांस लिहावयास येईल, असें ठरलें. दोप्रहरां बाईंजवळ सरदारांकडील दोन चिठ्ठ्या आल्या कीं, येथून कूच करून आज घुगरीस गेलों. शिलेदारांनीं अटकाव केला होता, परंतु त्यास सांगितलें कीं, श्रीमंतांची आज्ञा आली, त्यापक्षीं एका कोसाचें तरी कूच केलें पाहिजे. असे बोलून चौकोसांवर घुगरी गांव येथून आठ कोस तेथें मुक्कामास गेले. शिलेदार लोकांस दररोज पंचवीस रुपये पोटखर्चीस देतात. ते पुढें मजुरा घेतील. दोन चार दिवस आंबवून शेवटीं कांहीं कोणास, अधिक उणें करून घेऊन येतील आणि तेही येतील, असें दिसतें. राजश्री मल्हारराव त्यांजजवळच आहेत. छ २४ गुरुवार एकादशी, कचेरी जाली नाहीं. येथून पुढें होईल तसें सेवेसीं लिहीन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.''

---

## लेखांक ३९४

**श्री** ता. ३० आगस्ट, इ. स. १७९४

''सेवेसीं विनंति सेवक कचो जनार्दन निसबत केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ४ माहे सफर भानुवासरपर्यंत सेवकाचें वर्तमान मुक्काम महेश्वर यथास्थित असे. विशेष : येथील वर्तमान चंद्र २५ मोहरमीं विनंतिपत्रें लिहून, सेवेसीं रवाना केली आहेत. त्यानंतर येथील वर्तमान, राजश्री तुकोजी होळकर सुभेदार यांचा मुक्काम घुगरी अलीकडे नदीवर होता. नऊ दहा मुक्काम त्या तळावर जाले. राजश्री मल्हारराव होळकर जवळच आहेत. इतके दिवस खांसे डेऱ्यांत रात्रंदिवस एक जागां राहणें पडलें, त्यामुळें चिरंजीवाचे अवगुण दृष्टीस पडले. .... .... .... ....

.... .... .... .... .... .... .... .... .... .... ....

.... .... .... .... .... .... .... .... .... .... ....

.... .... .... .... .... .... .... .... .... ....

.... .... .... .... .... .... .... .... .... ....

.... .... .... .... .... .... .... .... .... .... ....

.... .... .... .... त्यावरून खिजमतगारास मार दिल्हा. तोही पळून गेला. याप्रमाणें खाशांनीं वर्तणूक पाहिली. त्यावरून मशारनिल्हे यांस निराळे राहोटीस जाबत्यानें ठेविलें आहे. मुसा दुदरनेक फरासीस चंद्र २६ मोहरमीं राजश्री सुभेदार यांचा निरोप घेऊन येथें आले. मातुश्री बाई यांची भेट घेतली. बाईंनीं त्यांस खर्चास तीस हजार रुपये देविले आणि निरोप दिल्हा. फरासीस यांनीं विसा दिवसांचा करार करून, इंदुरास चंद्र २७ मोहरमीं गेले, कीं वीस दिवसांत पलटणसुद्धां येऊन पोहोचतों. याप्रमाणें बोलून

गेले. चंद्र २९ मोहरमीं वस्तींत, गाय सातां महिन्यांची व्याली. तिने आपला जार खाऊन, वासरूही खाल्लें. हे वर्तमान बाईंस कळलें. त्यावरून बाईंनीं वेदशास्त्रसंपन्न राजश्री धोंड दीक्षित यांस पुसावयास पाठविलें कीं, याप्रमाणें दुःचिन्ह जालें, यास काय करावें ? त्यांनीं सांगितलें कीं, हा दोष आपल्याकडे नाहीं; ज्याची गाय असेल त्याजकडे. त्यावरून बाई स्वस्थ जाली. चंद्र २९ मोहरमींपासून चंद्र २ सफरपर्यंत बाईंनीं दक्षणा ब्राह्मणांस श्रावण मासाची अनुष्ठानाची दिल्हीं. तीन सहस्त्र ब्राह्मण मिळाला होता. एक मासपर्यंत भोजनास सुंदर घातलें. दक्षणा पंचवीस हजारपर्यंत वांटली. गुदस्तांपेक्षां यंदा अधिक दिली. ब्राह्मण थोडाच मिळाला होता. शिवाय भोजनाची रोजची दक्षणा, याप्रमाणें होऊन लक्ष भोजनाची समाप्ति जालीं. चंद्र ४ सफरीं सत्र दक्षिणी ब्राह्मणांचें बंद करविलें. येथून रांगडे ब्राह्मणांचे चालतें होईल. शिलेदार वगैरे लोकांचे धरणें, सरदारांजवळ गवगवा होता तो मिटला. एकांनीं एक येऊं लागले. सरदारांनीं साफ सांगितलें कीं, मातुश्री बाई वडील आहेत; ते देतात त्याप्रमाणें घ्यावें; सर्वांची वाट पडली आहे. त्यावरून हल्लीं दररोज लोकांचीं कबजें आकारून एका दोघांच्या चिठ्ठ्या देतात. सरकारची ताकीद सरदारांस येण्याविषयीं, दोन तीन वेळां पत्रें आली. त्यावरून हल्लीं चंद्र २ सफर शुक्रवारीं कूच करून कसबर शेगांव येथें नदीवर मुक्काम केला. चंद्र ३ शनिवारीं कूच जाले, ते नागलवाडीस गेले म्हणून वर्तमान येथें बाईंजवळ आले. नागलवाडीहून आज कूच करून सेंधव्यास जाणार. याप्रमाणें कूच दरकूच सेंधव्यास पावतील. काल रात्रीस सरदारांकडील चिठी बाईंस आली कीं, कारभारी यांस लवकर बिदा करावें. खर्चास पाठवावे. त्यावरून बाईंनींही कारभारी यांस ताकीद केलीं कीं, चौ दिवसांनीं भागवतपारायण सप्ताश्रवण करावयास मी बसेन, मग फावणार नाहीं. तुम्ही आपला गुंता लवकर उरकून, पौर्णिमे आंत येथून निघावें. याप्रमाणें ताकीद, दिवाण, फडणीस, दप्तरदार यांस जाली आहे. परंतु कारभारी यांस येथें आठ पंधरा दिवस लागतील. अद्याप गुंते कांहींच उरकले नाहीत. परगणे कोंच येथील मामलतीची घालमील करितात. राजश्री विठोबा निसबत आंबोजी इंगळे यांजकडे सांगणार; सरदारांची मर्जी त्यांजकडे सांगावी असें नाहीं; परंतु बाई सांगणार. पहिले मामलेदार आहेत त्यांचे फाजील देऊन, सवा लक्ष रुपये पदरीं पडतात, याजमुळे घालमील करणार. राजश्री चिमणाजी जयराम पारनेराहून येथें चंद्र २ सफरीं दाखल जाले. सरदारांची भेट मार्गांत घेऊन, येथें बाईंचे भेटीस आले. सांप्रत येथेंच आहेत. कारभारीयांचे बरोबर तेही कूच करितील. राजश्री दादाजी गंगाधर यांचा निरोप होता, (तो) सरदारांजवळ परभारा सांगितला. मग काय असेल तो न कळे. राजश्री सुभेदार सेंधव्यास पावल्यावर तेथें दोन तीन मुक्काम करून, सत्वरच घाट उतरून थालनेरास जातील. तापी उतार आहे. फौजेचा जथ अद्याप पुरतेपणें जमला नाहीं. दसरा चांदवडास करावयास जावें, अशी बोलवा आहे. याउपर घडून येईल तें खरें. जयपुरकर राजे यांचें संधान येथें आहे. ते राजश्री रोडजी खवास यांजकडील भला माणूस येथें आहे. बाईंशीं व कारभारीयांशीं बोलणें होत आहे. येथून उपराळा होईल तो खरा. अद्याप बोलणें निश्चयांत नाहीं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना. राजश्री देवराव तात्या यांनीं लखोटे रवाना

करावयास दिल्हें, ते सेवेसीं पाठविले आहेत. पावतील. हे विज्ञापना.''

---

## लेखांक ३९५

**श्री** ता. ३० आक्टोबर, इ. स. १७९४

''सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ५ माहे रविलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः – येथील वर्तमान चंद्र २२ रविलावल विनंतिपत्रें लिहून सेवेला रवानगी केली आहे, त्या तारखेस राजश्री देवराव यांनीं पत्रें दिलीं तीं, लखोटे सुमारें चार रवाना केले आहेत, प्रविष्ट जाले असतील. सांप्रतचे वर्तमान, राजश्री आनंदराव होळकर येथें आहेत. राजश्री पाराशर दादाजींस घेऊन जाणार. त्यांचें जाणें होत नाहीं. विना पैशांखेरीज ते जात नाहींत. पैशाची तोड पडत नाहीं. चांदोड व नंदुरबार वसूल ..... (कागद फाटला) देशमुखीचा ऐवज चांदोडचा, ऐसें मिळून सहा लक्ष रुपये राहिले. त्याजवर जाणें होत नाहीं. आणखी आवाडकर व इंदुरकर यांस बोलावूं गेले. इंदुरकर येथें आले. त्यांजला दुसाला रुपये पांच लक्ष मागतात. तीन साडेतीन लाख रुपये देऊं म्हणतात. जाबसाल पक्का नाही. आलेले हिशेब, वराता सरदार तेथें करितात. राजश्री वामनाजी हरीस बोलावूं स्वार गेले आहेत. आल्यावर त्यांजकडील जाबसाल होणें तो होईल. पाराशर दादाजींस चंद्र ३ रविलाखरीं बाईंनीं बहुत प्रकारें सांगितलें कीं, तुम्हीं चित्तावर घेऊन दिवाणगिरीचें काम करून चांगला बंदोबस्त करणें. कांहीं पैसा मी देईन. कांहीं तुम्ही आपले जातीवर घेऊन, फौजेची तोड पाडून, पुढें जमाव करून सरकारचाकरी करावी. त्यांनीं साफ उत्तर दिल्हें कीं, सरदारींत आळा नाहीं, माझ्यानें हें काम होणार नाहीं. मी शिलेदारीनें आहे, तसा राहीन. नाहीं तर श्रीकाशीस, आज्ञा करा, जाईन. येणेंप्रमाणें उत्तर दिल्हें. पुढें तजवीज करून कोणास काम सांगतील न कळे. नारोपंताचे चिरंजीव, त्यांचें बोलणें तेथें इंदुरीं लागलें आहे. राजश्री देवराव यांस चंद्र ४ रविलाखरीं इंदुरास राजश्री सुभेदारांकडे पाठविलें. समागमें राजश्री पांडुरंग शंकर यांस दिले. कारण, आम्ही सरकारआज्ञेचे लक्ष धरून मान्य केले. सरदारांचा रुकार घेऊन यावा म्हणून पाठविलें आहे. मशारनिल्हेंनीं सेवेसीं बजिन्नस पत्र लिहून दिल्हें, तें पाठविलें आहे; त्यावरून श्रवण होईल. मजला घरांस जाऊन हुजूर यावयाची आज्ञा. त्यास, आज्ञेप्रमाणें अश्विन वद्य पक्षीं निघून येत होतों. परंतु बाईंनीं सांगितलें कीं, राजश्री जयराम रावजी पौर्णिमा करून निघतील, त्यांजसमागमें मार्गस्त करून देईन; त्यावरून राहिलो. याउपर कार्तिक वद्य २ निघून शहरास जातो. तेथें मुलें माणसें. ठेवावयाची सोय नाहीं. तेथून कुटुंब घेऊन, वेरुळीं ठेऊन, सेवेसीं येईन. येथील बंदोबस्त अद्यापि होत नाही. दौलतीत बखेडा फार आहे. मुसा नाराज यांचे चिरंजीवास निरोप दिल्हा. तो माळवे प्रांतीं जाणार. बाईंनीं त्यास ताकीद केली, आमचें घरी मल्हारराव यांची चाकरी करूं नये व राजश्री पाटीलबावांकडे राहूं नये. मग कोठें चाकरी

करावी. याप्रमाणें निक्षून सांगून निरोप दिल्हा. बारा हजार रुपये त्यांस पावते जाले. शेवटीं निरोप दिल्हा. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.''

---

## लेखांक ३९६

**श्री** ता. १८ जानेवारी, इ. स. १७९५

''सेवेसीं विनंति सेवक कचो जनार्दन नि।। केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ० २६ माहे जमादिलाखर रविवारपर्यंत सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष : येथील वर्तमान छ० १२ मिहूस विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केली आहेत. त्यानंतर इकडील वर्तमान येणेप्रमाणें कलमबंदी :

राजश्री दादाजी गंगाधर यांचीं पत्रें मातुश्री बाईस छ. १२ जमादिलाखरपासून आजपरियंत दोन तीन आली. त्यांतील भाव कीं, नवे कारभारी याजकडून कामाचा बंदोबस्त होऊन येत नाहीं. स्वारी मोहिमशीर, लोकांचा गवगवा, ऐवजाची तोड व कामाचा आटोपही नाही, म्हणून सरदारांचे बोलणें आम्हांकडे पडतें, व सरकारचेंही मानस. त्यास या गोष्टीची सल्ला आपली पाहिजे. अभयपत्र येईल तशी वर्तणूक घडेल. याप्रमाणें कितीक मजकूर त्यांनीं आपलेपरी लिहिला होता. त्याचीं उत्तरें द्यावयास अनमानली कीं विचारून सांगूं. त्याउपरी त्यांनीं एक दोन वेळां लगट करून उत्तरें मागितली. तेव्हां मोघम मजकूर लिहून उत्तरें दिलीं कीं, तुम्हीं आपली आपअवसान पाहून, जी गोष्ट परिणामास उत्तम होईल ती विचारून करावी. या प्रकारची दिली म्हणोन कळले. ते सेवेसीं लेखन केलें. खुलाशाची पत्रें दिल्हीं नाहीत, केल्या कर्माचा अभिमानही आहे. विनायक बाजीराव एक दोन ..... (कागद फाटला) पण बंदोबस्त करावा हें चांगलें. ते एखादे जाबसाल उरकितात. मग आपल्यास विषम वाटेल. त्यास उत्तरें द्यावी, तेव्हां पत्रें लिहून दिधलीं. कलम १

राजश्री शिवाजी गोपाळ हे, राजश्री दादाजींकडील पत्रें आलीं तेव्हां होते. नंतर विचारून श्रीपुष्करास गेले. बाईंचा निरोप घेऊन छ १५ जमादिलाखरीं येथून स्वार होऊन निघाले. दोन महिन्यांनीं येणार. कलम १

कारभारप्रकरणीं बाईंचें बोलणें पडलें कीं, आजपर्यंत जसा कारभार चालवावयाचा तो बरा वाईट सांबानें निभावला. आतां ज्याचा त्यांनीं आटोपून मजला काशीयात्रेस जावयाचा निरोप द्यावा. माझ्यानें आतां होत नाहीं व देखवतही नाहीं. हें बोलणें अंतःकरणापासून नाहीं. बाह्यात्कारें मात्र दाखवितात. या प्रकारें वर्तमान ऐकिलें, त्यावरून लिहिलें असें. कलम १

येथील कारभारीयांत दोन पक्ष : राजश्री दादाजी गंगाधर यांजकडील कारकून व पारनेरकरांकडील हा एक व दुसरा राजश्री गणपतराव नारायण यांजकडील. एकमेकांची पत्रें येतात ती, एकांतीं कोणास कोणी न दाखवितां, कवाडे लावून वाचतात. त्यात बाईंचा

प्रकार कोणाकडेही पुरता नाहीं. कलम १

राजश्री सुभेदार यांचीं पत्रें मातोश्रीस आलीं कीं, वडिलीं कारभारी करून दिले, यांजकडून ऐवजाची सरबरा होऊन, कामाचा बंदोबस्त होऊन येत नाहीं. खर्चाची अडचण बहुत आहे. दुसरी एखादी गोष्ट करावी, तर ठीक पडेल. याजकरितां पत्रें लिहिलीं आहेत. उत्तरें आली पाहिजेत. म्हणोन मजकूर बहुत लिहिला होता. त्याची उत्तरें खुलाशाचीं लिहून दिधलीं नाहींत. मोघम लिहून दिलीं कीं तुमचे सोईस येईल, जसा प्रसंग पहाल, तशी गोष्ट उचित तें करावी. ज्यांत परिणाम उत्तम दिसेल तें करावें. आमचा आग्रह नाहीं. आणखी कितेक मजकूर लिहिला होता, त्याचीं उत्तरें कार्याकारण लिहून दिल्हीं. कलम १

राजश्री गणपतराव नारायण यांचीं दोन वेळा पत्रें आली. त्यांनीं आपला मजकूर लिहिला होता. तीं पत्रें त्यांजकडील कारकुनांनीं वाचून दाखविली. ऐकून मात्र घेतलें. उत्तर केले कीं, म्यां लग्न मात्र लावून दिल्हें. कामाची निभावणी, सरदारांचे साधन व सरकाराचे व कारभारीयांचे साधन तुम्हांकडून न होय. त्यास मी काय करूं ? उपरांत पत्राचें उत्तर मागांवयास कारकून व मुकुंदराव हरी यांची मातुश्री आकाबाई गेली. त्यास बोलली कीं, मी पत्रांचे उत्तर काय देऊं? जो कोणी पंचवीस लक्ष रुपये देईल तो दौलतीचा कारभार करील. त्यांत तुम्ही आपले घरदार पाहून जी गोष्ट करणें ती करावी. येथून लाख रुपये पाठविले होते, ते वरचेवर उडाले. त्यांजकडीलही पत्रें, दहा रोज जाले आलीं आहेत. त्यांस उत्तर देत नाहीत व तुमचींही देणें नाहींत. त्याउपर तिसरें दिवशीं मागतीं आका व कारकून राजश्री रामचंद्रपंत व मुकुंदराव जिवाजी हे बोलावयास गेले होते. त्यांची खातरजमा केली कीं, तूर्त मी सरकारांत पत्र लिहीत नाहीं. विना सरकार, मजला लिहिल्यावेगळीं गोष्ट करणार नाहीत, हा भरंवसा आहे. तथापि केली तरी करोत. मीं जी गोष्ट केली, ती विचारूनच केली. त्याची निभावणीं करणें धन्याकडे. त्यांनीं खातरजमा करावी. इकडूनही उपराळा राखीन. सरकारचीं पत्रें मजला आली म्हणजे त्यांची उत्तरें मजला जशीं कळतील तशीं लिहीन. विना सरकारचीं पत्रें आल्याखेरीज मी कांहीं सरकारांत लिहीत नाहीं. त्यांचीं पत्राचीं उत्तरें लिहून द्यावींसी ठरलीं. ती पोकळ खातरजमा मात्र. एखादी गोष्ट बोलल्याप्रमाणें निभावणी करतील हा भरंवसा नाहीं. मिजाज एकरूप कायम नाहीं. कलम १

सदरहू पांच कलमें सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.''

---

## लेखांक ३९७

**श्री** ता. १८ जानेवारी, इ. स. १७९५

''सेवेसीं विनंति सेवक कचो जनार्दन नि।। केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ० २६ माहे जमादिलाखरपर्यंत वर्तमान यथास्थित असे. विशेषः – येथील वर्तमान येणेप्रमाणें कलमबंदी :

राजश्री सुभेदार यांजकडे लष्करांत खर्चांची विपत्य. लोकांची धरणीं, नित्य हंगामे होऊ लागले. तेव्हां हे वर्तमान सरकारांत समजल्यावर, सरकारांतून पांच लक्ष रुपये साहुकारांकडून तूर्त खर्चास देविले. म्हणोन हें वर्तमान बाईंचे येथें आले. बाईंस कळल्यावर बाई, राजश्री विनायक बाजीराव यांसीं सरदारांस व कारभारी यास रागें भरून बोलिली कीं, सरकारचा पैसा कां घ्यावा ? अशी काय गांठ येऊन पडली होती ? लाख रुपये, पाठविले होते; आणखी ऐवज पाहिजे म्हणोन तजविजीत असतां, सरकारचा पैसा घ्यावा ही सल्ला चांगली न केली. ते जबरदस्त. त्यांचा पैसा न पावला, तर महाल जप्त करून घेतील, सरदार आपले पुंजीस हात लावीत नाहीत. पुढें कोणत्या उपयोगीं पडणार? वेळेस नाही तों कारभारी काठीनें पाणी सेवितात. अशानें कसा कारभार चालेल? या प्रकारें बोलणें जालें तें लिहिले असे. कलम १

राजश्री जिवाजी बल्लाळ हे तापी उतरून फर्दापूरचे घाटानें चढून गेले. बरोबर फौज जमा लुटारी बहुत आहेत. लोकांचा खाया खर्चाचा हंगामा आहे. तसेंच चालढकल करून जातात. बऱ्हाणपुरांतून सावकाराकडून दीड लक्ष रुपये घेतले. होळकरांकडील महालपैकीं, रावेर येथें सहा मुक्काम होते. तेणेंकडून महालाची खराबी फार जाली. दहा बारा गांव बेचिराख जाले व अवांतर महालांच्या नुकसान्या फार जाल्या. त्यामुळें कमाविसदारांचे बोभाटे येथें आले. त्यावरून बाईंनीं पत्रें सरदारांस लिहिलीं कीं हें वर्तमान सरकारांत श्रवण करून शिंदे यांस ताकीद करवावी. राजश्री देवजी गवळी देशचे महालांस उपद्रव देऊन घांसदाणा घेतात. असें वर्तमान येथें आलें. त्याजवरून लिहिलें असे. कलम १

राजश्री संताजी होळकर हे, सेंधव्याचे बाहेर जमियत घेऊन, भिल्लांचे पारिपत्यास्तव निघाले आहेत. भिल्लांनीं उपद्रव सेंधव्याचे आसपासचे गांव मारूं लागले. म्हणोन, त्यांजवर बाईंनी पायचीं माणसें दीडशें, उपराळ्यास पाठविलीं आहेत. भिल्लांचे पारिपत्य होऊन येईल तें खरें. कलम १

सरकारांतून फौजेची हजरी घेण्याविसीं कारभारी यांस ताकीद जाली, हें वर्तमान येथें बाईंस आले. त्यावरून येथील कारभारी यांस ताकीद केलीं कीं, सरंजामीयांचीं पथके राजश्री खंडो रामाजीजवळ गिराशाचे पारिपत्यास्तव आहेत, ती बोलावून घेऊन सरदार यांजकडे रवाना करावीं. तेथें हजरीचा प्रसंग आहे. पथक्यांस ताकिदीचीं पत्रें लिहिविलीं. दुसरें बोलणें कीं, इकडे लागल्यास चार हजार फौज नवी ठेवीन. या प्रकारें बोलणे जालें तें सेवेसीं लिहिलें असे. कलम १

राजश्री तुळसाजी वाघ यांजकडील पथक महतपुराहून येथें आले. दोन अडीचशें स्वारसरंजाम आहे. येथें चार मुक्काम होते. नंतर बऱ्हाणपुरचे मार्गानें जाण्याचें सांगितलें आहे. कारण, खानदेश प्रांतीं पेंढारी, राजश्री जिवाजी बल्लाळ यांजकडील उपद्रव विशेष देतात. त्यांस शह देऊन पुढें जावें. त्याप्रमाणें पथक नर्मदा उतरून गेलें, छ २२ मिनहूस. कलम १

मातुश्री बाई यांजकडील कारकून राजश्री आंबाजी दादाजी, गिराशांनीं धरून नेले होते; ते सुटून येथें छ० २२ मिनहूस येऊन भेटले. दुसरें रोजीं शेरणी वाटली; व त्यांस

मेजवानी करून वस्त्रें व शालजोडी दिधली. कारकूनमजकूर यांनी बाईंस नजर एक घोडीं सरंजामासुद्धां पांचशें रुपयांची नजर केली. शिवाय पानदान वगैरे दोन जिनसा दिल्ह्या.
कलम १

राजश्री खंडेराव रामाजी, पागा सरंजामसुद्धां, माळवे प्रांतीं गिराशावर शह देऊन जावऱ्याचें आसपास होते. त्यास, रिंगणोद परगण्यातील एक गढी खालीं करून, पुढें सोद्याचे पारिपत्यास पिढावे व रामपुरा प्रांतीं गेले. कलम १

पाो इंदूरचे आसपास गिराशांनीं मागतीं उपद्रव मांडिला. शहरात डाके पडूं लागले. म्हणोन बाईंनीं राजश्री मानाजी होळकर यांस पन्नास स्वार देऊन, शहराचे रखवालीस पाठविले आहेत. कलम १

मातुश्री मानसीबाई होळकर यांचे पहिले भाऊबंद खानदेशांत कोणी आहेत, त्यांचे भेटीस्तव बाईंचा निरोप घेऊन, सरंजामसुद्धां कूच करून गेली. सेवेसीं कळावे.
कलम १

सदरहू नऊ कलमें सेवेसीं श्रुत होतील. जाले ते वर्तमान लेखन केलें. पुढें घडेल ते सेवेसीं लिहीन. हे विज्ञापना.''

---

## लेखांक ३९८

**श्री** ता. ६ फेब्रुवारी, इ. स. १७९५

''सेवेसीं विनंति सेवक कचो जनार्दन नि।। केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ० १५ माहे रजब भृगुवासर प्रातःकालपर्यंत सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष : येथील वर्तमान काल डाकेबरोबर विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केली आहेत. त्यानंतर इकडील वर्तमान, सरकारी लखोटा एक, मुजरद कासीद जोडीबरोबर रवाना जाला, छ ८ रजबी. तो येथें छ १३ माहे मीनहूस मागील चार घटका दिवस राहतां पोहोचला. गंगाजळनिर्मळ मातुश्री अहिल्याबाई यांचे नांवाचा लखोटा होता. पावतांच क्षणीं जाऊन, वर्तमान कानावर घातलें. सायंकाळचें स्नान करून जपांत होती. खुणेंकरून सांगितलें कीं, भोजनोत्तर पत्रें श्रवण करीन. ते दिवशीं ग्रहणाची कर होती. स्नानें करून, दानें करून श्रमली होती. दिवसभर उपोषण. रात्रीस भोजन जाल्यानंतर कांहीं कचेरी जाली होती, ती बरखास्त करून, बिछान्यावर एकलीच बसून, कारभारीयापैकीं राजश्री विनायक बाजीराव व बाळाजी कृष्ण यांस बोलावून, त्यांजकडून पत्रें अक्षरशः श्रवण केलीं. सरकारचें पत्र एक व नबाबाकडील वकिलाचे पत्राची नक्कल एक होती. मजकूर, प्रेमसुख जोहरी याचा होता. तो ध्यानास आणून, सरकारआज्ञेप्रमाणें तेच क्षणीं, सवा प्रहररात्रपर्यंत बसून, जागां जागां घाटनाके येथील कमाविसदार यांस पत्रें लिहून रवाना केलीं व आसपासचे जवळ

होते, त्यांस समक्ष बोलावून ताकीद करून, बंदोबस्त करवला. दक्षिण उत्तर पहाडाचे घाट व नाके, चोरवाटा व उभय रेवातील येथील नाव घाट पायउताराचे तर नेमावरपर्यंत, याजकडील जिल्ह्यांतील झाडून बंदोबस्त करविला. राजश्री रघुनाथपंत यांस बऱ्हाणपुर येथें पत्रें पाठविलीं... येथील कमाविसदार यांस व जमीदार भूमे वगैरे यांस ताकीदी सांगून पाठवून, नंतर सवा प्रहररात्रीस निद्रा केली. प्रत्योत्तराविशीं विनंति काल केली. त्यावरून सरकारचें पत्राचें उत्तर रात्रीस लिहून दिल्हें, तें आज सेवेसीं रवाना केलें आहे. सरकारांतून हुजरे व कासीदजोडी नेपाळचे कामगिरीस रवाना केले; ते येथें पोंहचून, त्यांच्या मार्गाचा बंदोबस्त करून देऊन, छ ५ रजबीं कूच करून पुढें गेले. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.''

---

## लेखांक ३९९

**श्री** ता. २ आक्टोबर, इ. स. १७९५

''सेवेसीं विनंति सेवक कचो जनार्दन नि।। केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ० १८ माहे रविलावल भृगुवासरपर्यंत सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष : येथील वर्तमान छ १३ मिनहूस विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केली आहेत. त्यानंतर इकडील वर्तमान, राजश्री काशीराव होळकर यांनीं परगणे जावेर येथील सोडचिट्टी भागवतास दिल्हीं. त्याची नजर रुपये तीस हजार ठरवून तिऱ्हायती निशा, दों सालात घ्यावे, अशी घेतली. त्यापैकीं पांच हजार खासगी नगर, याची निशा नगदीची घेतली. भागवताच्या बाया चौघी आहेत, त्यांस एक गांव सतंतर तोडून दिल्हा. सात हजार रुपये सरंजाम चाकरीस आहे. त्याचे खर्चास घेत जावें. याप्रमाणें होऊन भागवतांनीं आपलेकडून, मामलत रा पांडुरंग शिवाजी यांजकडे सांगितली. निशाही त्यांचीच आहे. कसबे करईची सोडचिट्टी शितोळ्याकडे दिली. पंचवीसशें नजर त्याजपैकीं बाराशें खासगी. याप्रमाणें तेथील कारभार केला. राजश्री भिवजी आघाडे यांचे काम किल्ले जांब येथील घांटाचें वगैरे पूर्ववतप्रमाणें सांगून सोडचिट्टी दिली. वस्त्रें दिल्हीं. नंतर मागतीं स्वार पाठवून आणून फेऱ्यांत घातलें आहे. सौभाग्यवती म्हाळसाबाई, संताजी होळकर यांची स्त्री व सौभाग्यवती आनंदीबाई काशीराव यांची स्त्री, यांजकडे कांहीं नजर कबूल केली होती, ती दिल्हीं नाहीं. म्हणोन त्यांचें ऐकून धरून आणले. त्यांस म्हणतात कीं, तू आपल्या भावास आणून हजर कर. त्यास शिक्षा लाविली पाहिजे. कैलासवासी बाई यांणीं त्यास काढून दिल्हें. तो देशीं गेला. बदकर्म त्याजपासून घडलें. याचा ऐवजही घेतला असता मागतीं उलटी खाऊन, चार रुपये दंडावे हा हेत आहे. पो।। इंदूर येथील वाणी, उदमी, बनाज, बोहरी यांस उपद्रव मनस्वी देतात. कोणी कोणाचा वाद्या फिर्याद सरकारांत आला म्हणजे, त्यांजकडे स्वार मसाला

पाठवीत असावें. शहरांत चोऱ्या होतात, याजसाठीं येथून पागा पाठविल्या आहेत. ते परभारें उपद्रव करितात, चोऱ्याही होतात. दाऊद बोहरा मातबर, त्याचा गुमास्ता फिर्याद जाला. याजकरितां स्वार पाठवून मसाला केला. हा कजीया लबाड. बाईंनीं छानबिन केली असतां मागतीं उपस्थित जाला. याजमुळें बोहोरी याची हरताळ येथें व इंदुरांत, खरगोण येथें पडली आहे. बोहोरी सारे जमा होऊन येथें आले आहेत. यावर काय इन्साफ करितात पहावें. इंदुरची रयत बेदील आहे. परगणे कायथे येथील मामलत पहिले मामलेदाराकडून दूर करून राजश्री रोडोजी होळकर यांस सांगितली. काल छ १२ मि।। वस्त्रें दिधलीं. वीस हजार रुपये घेतले. पहिले मामलेदारकडे फाजील आहे. ब्राह्मणाकडील काम दूर करून मराठ्याकडे सांगितलें. परगणे निंबहेडा येथील कमाविसदारांपासून अंतस्थ नजर घेऊन बिदा केलें. तेथील फडणीसी दूर करून, मामलेदाराकडे सांगितली. फडणीसांवर मामलेदारांनीं पन्नास हजार तकरारी केली. फडणीसानें सवालक्ष मामलेदारावर काढले. याप्रमाणें झालें. परंतु कोणाचे अंगी लावून पैसा घेतील, हा अर्थ तूर्त नाहीं. फडणीसाची जप्ती मामलेदारांनीं करविली. साडेतीन हजार रुपये अंतस्थ घेतले. राजश्री तुळसाजी वाघ महतपुरकर यांनीं सरकारांत श्रीमंतांकडे सूत्र लावलें आहे कीं, आम्हीं पहिलेपासून पदरचे असों. हल्लीं होळकरांचे आमचें बनत नाही. त्यापक्षी चाकरी सरकारांत करूं. हे वर्तमान राजश्री सुभेदार यांस तेथें समजलीयावर, त्यांणीं येथें चिरंजीवास लिहिलें कीं, तुम्हीं तूर्त वाघाकडे कोणीं पाठवून खातरजमा करावी. त्यास, राजश्री राणुजी शिंदे चोळीकर हे पहिले गेलेच आहेत, त्यांस पत्रें गेलीं आहेत. तीन लक्षांची वरात कर्जपट्टीऐवजीं केली आहे; त्याचा तगादा तूर्त मना करविला. याउपर काल छ १३ मिनहूस वाघाचीं पत्रें पुण्यास जात होतीं, ती धरलीं आहेत. त्यांतील भाव समजल्यावर लिहीन. सांप्रत निदर्शनास आलें, तें सेवेसीं लेखन केलें असे. पुढें घडेल ते सेवेसीं लिहीन. दुदरनेक फरासीस काल छ १३ मी रेवा दक्षिणतीरीं येऊन दाखल जाला. राजश्री सुभेदार यांजकडून आला. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.''

---

## लेखांक ४००

**श्री** ता. ९ डिसेंबर, इ. स. १७९५

''सेवेसीं विनंति सेवक कचो जनार्दन नि।। केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २६ जमादिलावलपर्यंत सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष : इकडील वर्तमान, राजश्री काशीराव होळकर यांणीं परगणे रामपुरा येथील कारभार केल्यामुळें, सुभेदार यांनी बहुत निषेध केला. बारा कलमांचे जाबसाल फिरवावे असें होतें. त्याप्रमाणें एक जाबसाल कायथ्याचा मात्र फिरला, बाकी जें आलें ते उत्तम ठरलें. राजश्री बाळाजी रावजी यांजला तिकडून सनदा आल्यानंतर, मागतीं येथून खातरजमेचीं पत्रें देऊन, शिरपांव शालजोडी देऊन, रामपुरास बिदा केलें. हल्लीं कारभार जो होतो तो. येथील आज्ञेखेरीज

होत नाहीं. लोकांचे समाजाविशींचा गवगवा, तसाच शागीर्दपेशास रोजमुरा एक देतात. त्यास ऐवज पदमसी पानसी यांचे दुकानदारापासून घेऊन, त्यास वराता, किरकोळी नजराणे वगैरे यांचा लावून दिल्हा. दुदरनेक फरासीस यांचीं धरणींपारणीं होतात. हल्ली त्यांस वराता कर्जपट्टीच्या वगैरे, सवा लाख रुपयांच्या लावून देऊन पाठविल्या आहेत. तो आपले जागां श्रमीच आहे. येथील मंडळ आपआपले जागां, कोणाचे कांहीं चालत नाहीं म्हणून, श्रमीच आहेत. सांप्रत सुभेदारांची सूचना चिरंजीवास आली आहे कीं, तुमची इकडे येण्याची सिद्धता असू देणें. पत्र लिहू तसें सत्वर येणें. येथील संस्थान मुख्यत्वेंकरून राजश्री रामराव आपाजी पळसीकर यांची नेमणूक होऊन पत्रें आलीं आहेत. हे आपले जागां श्रमी. काशीराव यांची शुद्धता नाहीं. दुसरें, या प्रसंगीं तेथें असावे म्हणोन चिंताग्रस्त आहेत. पुढें घडेल तें खरें. राजश्री लखोबा जगोबा यांनीं दतीयावाल्याशीं साम सांप्रतकाळीं केला. हिंदुस्थानांत सिखांनीं कांहीं गडबड मांडली आहे, वरकड राजे रजवाडे तमाम आपआपले ठिकाणीं स्तब्ध आहेत. राजश्री आंबोजी इंगळे दिल्लीस गेले म्हणोन, वर्तमान येथें आले. पुढें घडेल तसें सेवेसीं वरचेवर लिहीन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.''

---

## लेखांक ४०१

**श्री** ता. ३१ जानेवारी, इ. स. १७९६

''सेवेसीं विनंति सेवक कचो जनार्दन नि।। केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २० रजब रविवारपर्यंत सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष : येथील वर्तमान छ १४ मिनहूस विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केली आहेत. त्यानंतर इकडील वर्तमान, इलायतचा सुभा अबदाली याजबरोबर चाळीस हजार घोडा, शिवाय पायदळ, याप्रमाणें फौज तयार होऊन, अटक उतरून अलीकडे तीन मजला स्वारी आली. दिल्लीस यावे हा रूख आहे. अलीगौर बादशाहा याचा पुत्र शाहाजादा बरोबर आहे. त्याची स्थापना दिल्लीस करावी, हा विचार गिलच्यांचा आहे. रूमचें पातशहाचेंही संमत आहे. दिल्लींतील लोक खळबळले आहेत. मातबर लोक निघून लखनुरास जातात. चाळीस रुपये भाडें गाडीचें जालें आहे. मथुरेंत वगैरे चोरांचा उपद्रव. डाके पडतात. शीखांचें शहर आमरसेर (अमृतसर) उजाड जालें. याप्रमाणें बातमी येथें सावकाऱ्यांत जयपूरची व दिल्लीहून आली; त्यावरून सेवेसीं लेखन केले आहे. सत्य मिथ्या ईश्वर जाणें. राजश्री काशीराव होळकर यांचा कारभार पूर्ववत्प्रमाणें चालत आहे. दुदरनेक फरासीस यांची वरात, पंचविसा हजारांची इंदुरचे सायरचे कमाविसदार यांजवर लष्करांतून पेस्तर साल ऐवजीं जाली आहे. त्यावरून कमविसदाराचे कारकुनाचे मागें तष्ट. फरासीस यांचे दोन पाहारे नेहमीं बसले आहेत. त्यांस

पैसा मिळत नाहीं. मामलत नको अशी फारखती दिधलीं. घालमेल करावी, तर सुभेदारांची आज्ञा नाहीं. त्यावरून कारकुनास काशीराव यांनीं विचारलें. सर्व कारभारी बसून एकांत केला कीं, मामलत दूर न करावी आणि पैसा तर घ्यावा. कशी तजवीज करावी ? तेव्हां कोणी उत्तर देईनात. बोललें कीं, आम्हांस काय, जशी आज्ञा कराल तशी वर्तणूक करूं. त्या वरून घालमेल करावी असें ठरलें आहे. इंदूरचे नवे कमाविसदार केले आहेत, त्यांजकडे सांगणार. पुढें घडेल तसें लिहीन. खंडूजी लांबाते पतन पावले. ते मल्हारराव यांचे स्वशुर. याजकरितां काशीराव दोन वेळां गेले होते. इंदूरचा ऐवज सावकाराकडे जमा केला. पुढें लोकांस कांहीं द्यावे ह्या विचारांत आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.''

---

## परिशिष्ट : एक

# अहल्याबाई नव्हे, अहिल्याबाई

अहिल्याबाईसंबंधी लिहिताना काही लेखकांनी ''अहल्याबाई'' असा शब्दप्रयोग केला आहे. याबाबत विद्वानांमध्ये चर्चा झालेली आहे. अहिल्याबाईंविषयी लिहिताना रामायणातील अहिल्येचा संदर्भ दिला जातो.

''अहल्याबाई'' हा शब्द वापरणारे अभ्यासक, विद्वान आपल्या समर्थनार्थ तीन मुद्दे मांडतात.

१. अहिल्या शब्द व्याकरणदृष्ट्या अशुद्ध आहे.

२. शब्दकोशात अहिल्या शब्द नाही.

३. महेश्वरच्या शिलालेखात ''अहल्या'' हा शब्द लिहिलेला आहे.

या मुद्यांबाबतचा खुलासा खालीलप्रमाणे आहे.

१. कुठलेही विशेषनाम व्याकरणाच्या नियमांनी शुद्ध वा अशुद्ध ठरत नाही. या जगात जितकी विशेषनामे आहेत ती व्याकरणाच्या नियमांनी निश्चित केलेली नाहीत. व्याकरणाचे नियम व्यक्तीच्या विशेषनामात कुठलाही हस्तक्षेप करीत नाहीत. व्याकरणाच्या कुठल्या नियमाप्रमाणे ''अहिल्याबाई'' हा शब्द अशुद्ध ठरतो याचा कुठलाही उल्लेख व्याकरणाचा संदर्भ देणारे अभ्यासक करीत नाहीत.

अहिल्याबाईंची भाषा मराठी होती. त्यामुळे मराठी भाषेप्रमाणे व्याकरणातील कुठल्याही नियमाच्या आधारे ''अहिल्याबाई'' हा शब्द अशुद्ध ठरत नाही.

रामायणात वाल्मीकी ऋषींनी बालकांडात ४९ व्या सर्गात 'अहल्या' हा शब्द वापरला आहे. मात्र तिथे त्यांनी गौतम ऋषींची पत्नी अहल्या, असा उल्लेख केला आहे. यामुळे 'अहल्या' शब्द शुद्ध आणि 'अहिल्या' शब्द अशुद्ध अशा प्रकारचे विवेचन केले जात असावे. संस्कृत भाषेत गत आणि गति, दश आणि दिशा, भूत आणि भूति असे शब्द आहेत. त्यामुळे एका स्वरामुळे दुसरा शब्द अशुद्ध होतो हे विवेचन तर्कशुद्ध नाही. हे कुठल्याही नियमात बसत नाही.

प्राचीन काळातील शब्द शुद्ध आणि आधुनिक काळातील शब्द अशुद्ध असा कुठलाही नियम नाही. व्यक्तिवाचक नाम वा विशेषनामाच्या बाबतीत व्याकरणात असा कुठलाही नियम नाही.

संस्कृतमध्ये अहल्या म्हणजे रात्र. हा शब्द संस्कृत साहित्यात अनेक ठिकाणी आला आहे. संस्कृतचा पगडा असल्यामुळे कांहीं लोकांनी 'अहिल्या' शब्द अशुद्ध आहे असा मुद्दा मांडला असावा. मात्र संस्कृतच्या काही विद्वानांनी 'अहिल्या' शब्द हा 'अहल्या'

या शब्दाप्रमाणेच शुद्ध आहे असे म्हटले आहे.

*अहिना लीयते या सा अहिल्या।*
*अहिः लीयते अस्याम् इति अहिल्या।।*

संस्कृतमध्ये अहि शब्दाचे अनेक अर्थ होतात. उदा. सर्प, सूर्य, गृह, दुष्ट, मेघ इत्यादी. ली या धातुचा अर्थ लयति म्हणजे वितळणे, मिसळून जाणे (To melt, to dissolve, to absorve). 'अहि' शब्द यास्काचार्य यांच्या ''निरुक्त शास्त्र'' या ग्रंथातही आला आहे.

तात्पर्य, शुद्धतेचे निकष लावायचेच झाल्यास ''अहल्या'' या शब्दाप्रमाणे ''अहिल्या'' हा शब्दही शुद्ध आहे. दुसरे असे कीं, शब्दकोशात एखादा व्यक्तीनामवाचक शब्द नसला तर तो व्यवहारात प्रचलित होऊ शकत नाही का ? अनेक व्यक्तींची विशेषनामे कोशात नाहीत. मग ती नांवें अशुद्ध ठरतात का ?

'काशी नागरी प्रचारिणी सभा' यांनी प्रकाशित केलेल्या शब्दकोशात ''अहल्या'' या शब्दाचा अर्थ, ''जी नांगरता येत नाही ती (धरती)'' असा दिला आहे. यात गौतम ऋषींची पत्नी वा इंदूरच्या महाराणी अहिल्याबाई असा कुठलाही उल्लेख वा संदर्भ नाही. यावरून अहिल्या शब्द अशुद्ध आहे असे मानणे कुठल्याही प्रकारे तर्कशुद्ध नाही.

३. महेश्वरच्या शिलालेखामध्ये ''अहल्या'' हा कोरला आहे असा संदर्भ दिला जातो. पण महेश्वरचा शिलालेख अहिल्याबाईंच्या निधनानंतर लिहिला गेला आहे. त्यामुळे अहिल्याबाईंच्या नावाबाबत पार्श्वभूमी न तपासता एखादा विशिष्ट शिलालेख प्रमाण मानणे ऐतिहासिक दृष्ट्या संयुक्तिक नाही.

तात्पर्य, कुठल्याही व्यक्तीच्या नावाबाबत निर्णय घेण्यासाठी कुठल्याही व्याकरणाच्या नियमांची वा कोशाची गरज नाही. अहिल्याबाई आपले नाव कसे लिहित होत्या आणि त्यांचे समकालीन लोक त्यांना कुठल्या नावाने संबोधित होते हे महत्त्वाचे आहे. याबाबतीत कांहीं महत्वाचे संदर्भ आहेत. ते असे

१. गौरीकुंड येथें एक शिलालेख कोरलेला आहे. तो संवत १८१५ (इ. स. १७५९) मध्ये बनविला होता. हे कुंड अहिल्याबाई आणि मल्हारराव दोघांच्या नावाने बनविले गेले आहे त्यावेळी दोघेही हयात होते. त्यावर ''मल्हारराव'' आणि ''अहिल्याबाई'' ही नांवें कोरलेली आहेत.

२. गंगाधर यशवंत चंद्रचूड हे अहिल्याबाईंचे मंत्री होते. त्यांच्या ''चंद्रचूड दप्तर'' या ऐतिहासिक कागदपत्रात अहिल्याबाईंची कांहीं पत्रें संग्रहित होती. त्यात मातोश्रींनी आपले नाव ''अहिल्याबाई'' असे लिहिले आहे.

३. अहिल्याबाईच्या दरबारातील पेशव्यांचे वकील विठ्ठल शामराज आणि केसो भिकाजी दातार या दोघांनीही आपल्या महेश्वर दरबारच्या बातमीपत्रात अहिल्याबाईंची दिनचर्या, पत्रव्यवहार, दानधर्म, दरबार आदींबाबत लिहिले आहे. या दोघांनीही मातोश्रींच्या उल्लेख अहिल्याबाई असा केला आहे.

नमुन्यादाखल काही बातमीपत्रे पाहू.

अ) दि. १०-६-१७७९ ला विठ्ठल शामराज लिहितात, मातुश्री अहिल्याबाईवर खर्चाची वरात पाटीलबावांनीं पंचवीस हजारांची पाठविली.

(महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें, लेखांक १)

आ) दि. ११-६-१७८० ला त्यांनी लिहिले आहे, ''होळकरांकडील महाल रामपुरा, टोंक तोडा व फूट जहागिरीचे गांव अहिल्याबाईचे आहेत.''

(महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें, लेखांक ९)

इ) दि. ७-१-१७९१ ला केसो भिकाजी यांनी लिहिले आहे, ''गंगाजळनिर्मळ अहिल्याबाई यांचेही समाधान सर्वांनीं केलें आहे.''

ई) दि. १०-७-१७९४ च्या लेखांकात केसो भिकाजींनी म्हटलंय, ''गंगाजळनिर्मळ अहिल्याबाई यांनीं दिवाणगिरीचें काम नारो गणेश यांचे चिरंजीवाकडे सांगावे.''

''होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें'' या पत्रसंग्रहातही वेगवेगळ्या पत्रांमध्ये ''अहिल्याबाई'' हेच नांव आले आहे.

अ) माधवराव पेशवे यांनी दि. ११-१२-१७६७ च्या पत्रात लिहिले आहे, राजश्री अहिल्याबाई होळकर...

(खंड एक, होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें, पत्र क्र. २६९)

आ) सुभेदार मल्हारराव होळकरांनीं अहिल्याबाईना राज्यकारभार आणि युद्धनीतीबाबत अनेक पत्रें पाठविली. त्या पत्राचा मायना असा आहे.

''चिरंजीव अहिल्याबाई प्रती मल्हारजी होळकर आशीर्वाद.''

(खंड एक, होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें, पत्र क्र. १७५, २०४, २०५, २०९, २११, २१५, २१८, २१९, २२०, २२३, २२६, २२८)

नाना फडणवीस यांनी अहिल्याबाईंस जी पत्र लिहिली, त्यात त्यांनी मातोश्रींचा उल्लेख ''गंगाजळनिर्मळ अहिल्याबाई'' असा केला आहे.

(खंड तीन, होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें, पत्र क्र. ३५१, ३९२, ५३८, ५५४, ५७०, ६१२)

अहिल्याबाईंनंतर खासगीचा कारभार कृष्णाबाई होळकर यांच्याकडे आला होता. त्यांचा शिक्का असा होता.

''सरकार अहिल्याबाई कारकीर्द कृष्णाबाई''

मध्यप्रदेश सरकारने प्रसिद्ध केलेल्या इन्दौर जिल्हा गॅझेटियर (इ. स. १९७४) मध्ये मातोश्रींचा उल्लेख ''अहिल्याबाई'' असाच केला आहे.

अहिल्याबाईंच्या ज्या चरित्रकारांनी ''अहल्याबाई'' असा उल्लेख केला आहे

त्यापैकीं प्रमुख नांवें अशी - विश्वनाथ नारायण देव, मुक्ताबाई लेले, दत्तात्रय बळवंत पारसनीस इत्यादी. मात्र अ. ना. भागवत, वा. वा. ठाकूर, एम्. डब्ल्यु बर्वे, न. र. फाटक, उदयभानु शर्मा, हीरालाल शर्मा या अभ्यासकांनी ''अहिल्याबाई '' असाच मातोश्रींचा उल्लेख केला आहे. वा. वा. ठाकूर हे होळकर दरबारात इतिहास विभागाचे प्रमुख होते. त्यांनी होळकरशाहीचा इतिहास (२ खंड) आणि होळकरशाहीच्या इतिहासाची साधनें (२ खंड) हे ग्रंथ संपादित केले आहे. या दोन्ही ग्रंथांत मातोश्रींचा उल्लेख ''अहिल्याबाई'' असाच केलेला आहे.

माधवराव पेशवे, नाना फडणवीस, पेशव्यांचे वकील, महादजी शिंदे आणि हिंदुस्थानातील अन्य राजे कागदपत्रांत आणि पत्रव्यवहारांत मातोश्रींचा उल्लेख 'अहिल्याबाई' असाच करीत.

ऐतिहासिक कागदपत्रे, होळकरशाहीतील पत्रव्यवहार, पेशवे दप्तर, इंग्रज अधिकाऱ्यांची कागदपत्रें, सर जॉन मालकम यांचा 'A Memoir of Central India Including Malwa' हा ग्रंथ, वकीलांची बातमीपत्रे, वकीलांचा पत्रव्यवहार, वेगवेगळ्या सरदारांची दप्तरे अशा सर्व ठिकाणी मातोश्रींना 'अहिल्याबाई' या नावाने संबोधिलेले आहे.

अलीकडच्या काळात अनेक साहित्यिकांनी लेख, कादंबरी अशा विविध साहित्य प्रकारात अहिल्याबाईंसंबंधी लेखन केले आहे. या सर्वांनी आपल्या साहित्यकृतीत 'अहिल्याबाई' हाच उल्लेख केला आहे. त्यापैकी कांहीं प्रमुख साहित्यिक व त्यांच्या साहित्यकृती अशा :

दुर्गा भागवत (पैस), विजया जहागिरदार (कर्मयोगिनी), नयनतारा देसाई (माहिष्मती), नलिनी सहस्त्रबुद्धे (राजयोगिनी), मृणालिनी देसाई (बिल्वदल), प्रभाकर पानट (अष्टावधानी), दा. वि. कुलकर्णी (सहस्त्रधारा), नीलांबरी गानू (शिवयोगिनी, गंगाजळनिर्मळ), वा. वा. खरे (ऐतिहासिक लेखसंग्रह), य. न. केळकर, अ. ना. भागवत (होळकरांची कैफियत), म. श्री. दीक्षित (पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकर), धर्मभास्कर (अहिल्याबाई विशेषांक, १९७५), दासगणू महाराज (अहिल्याबाई होळकर यांचे चरित्र), राजाराम रामकृष्ण भागवत (अहिल्याबाई होळकरीण), डॉ. गणेश मतकर (होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहास), डॉ. पुष्पलता शेट्ये (देशोदेशीच्या गोष्टी - भाग ६), विनया खडपेकर (ज्ञात-अज्ञात अहिल्याबाई), मुक्ता केणेकर (लोकराज्ञी), रमेश नाईक (ती एक अहिल्या होती), गाविंदराव काळे (अहिल्या गाथा), देवीदास पोटे (अ.. अहिल्याबाईंचा), सुमित्रा महाजन (मातोश्री).

यावरून मातोश्रींचे ''अहिल्याबाई'' हेच नाव ऐतिहासिक सत्य या कसोटीला उतरणारे आहे. म्हणून अहल्याबाई हा उल्लेख चुकीचा असून ''अहिल्याबाई'' हे नाव योग्य आहे, असे सर्व उपलब्ध कागदपत्रांवरून सिद्ध होते.



## परिशिष्ट : दोन

# होळकर रियासतीतील विविध पदनामे आणि त्यांची कार्ये

| | | |
|---|---|---|
| **कमाविसदार** | – | शेतसारा वसूल करणारा, कलेक्टर |
| **कासीद (काशीद)** | – | संदेशवाहक, गुप्तहेर |
| **कारकून** | – | लिपिक |
| **कारभारी** | – | कार्यवाह |
| **किल्लेदार** | – | किल्ल्याची देखभाल आणि रक्षण करणारा प्रमुख |
| **खिदमतगार** | – | सेवक |
| **खिजमदगार** | – | सेवक |
| **खासगी** | – | होळकर घराण्यातील स्त्रियांची व्यक्तिगत संपत्ती |
| **खासगीवाले** | – | खासगीचा हिशोब ठेवणारे |
| **गाडदी/गारदी** | – | पहारेकरी, रक्षक |
| **गिराशा** | – | लूटमार करणारा |
| **गुमास्ता** | – | मुनीम |
| **चिटणीस** | – | पत्रव्यवहार करणारा, सचिव |
| **चोपदार** | – | रक्षक |
| **जमीदार** | – | वतनदार |
| **जासूद** | – | पत्रवाहक |
| **जासूस** | – | गुप्तहेर |
| **जहागिरदार** | – | जहागिरीचा मालक |
| **तोफदार** | – | तोफा उडविणारा |
| **दिवाण** | – | मंत्री, मुख्य अधिकारी |
| **नायब** | – | प्रतिनिधी |
| **पागेदार** | – | घोडेस्वारांचा नायक |
| **पागनीस** | – | घोडदळाचा अधिकारी |
| **पातशहा** | – | दिल्लीचा बादशहा |
| **परगणा** | – | तालुका |
| **पेंढारी** | – | लूटमार करणारे हंगामी सैनिक |
| **फडणीस** | – | दप्तराचा अधिकारी |
| **बारगीर** | – | सामान्य सैनिक |

| | | |
|---|---|---|
| **बारदार** | – | बंदुकधारी |
| **बल्लाळ** | – | पराक्रमी |
| **बुणगे** | – | सैन्यातले लढाई न करणारे लोक |
| **भालदार** | – | द्वारपाल |
| **महालनवीस** | – | जिल्हा अधिकारी |
| **मामलेदार/मामलतदार** | – | तहसीलदार, वसुली अधिकारी |
| **मोकाशी** | – | इनामदार, वतनदार. ज्यास गांव व जमीन इनाम वा चाकरीबद्दल दिले अशी व्यक्ती |
| **मंडल** | – | क्षेत्र, विभाग |
| **मंडलेश्वर** | – | क्षेत्राधिकारी, विभाग अधिकारी |
| **महाल** | – | जिल्हा |
| **रिसालेदार** | – | घोडदळ पालक |
| **राऊत** | – | घोडेस्वार |
| **वकील** | – | राजदूत, प्रतिनिधी |
| **शिलेदार** | – | स्वतःचा घोडा असलेला सैनिक |
| **शिबंदी** | – | किल्ला वा शहररक्षक फौज |
| **श्रीमंत** | – | पेशवे (पुणे) |
| **सईस (मोतद्दार)** | – | घोड्याला खरारा आणि त्याची देखभाल करणारा |
| **सरकार** | – | पेशवे |
| **सबनीस** | – | पगार वाटणारा अधिकारी |
| **सुभेदार** | – | प्रांताचा राजा |
| **सावकार** | – | व्याजावर कर्ज देणारा |

(सौजन्य : प्रा. ना. ग. काळे, इंदूर)



# शब्दार्थ / टीपा

| लेखांक | पृष्ठ क्र. | शब्दार्थ /टीपा |
|---|---|---|
| १ | १ | **इजनांत** – ताब्यात (मूळ अरबी शब्द इज़न) |
| | | **जख** – नुकसान |
| २ | २ | **वरात** – सरकारी खजिन्यासाठी पैशाची मागणी करणारे लेखी फर्मान वा आज्ञा |
| | | **कही** – कबजा |
| | | **कही काबाड** – वस्ती करणे |
| २ | ४ | **कासीद** – पत्रे दुसऱ्या गांवाला नेणारे सेवक, टपालवाहक |
| | | **रोजमुरा** – पगार, वेतन |
| ४ | ७ | **मधुरा** – ज्या तापात गळ्याजवळ बारीक पुळ्या येतात तो ताप |
| ५ | ७ | **दारमदार** – करारमदार, तह |
| | | **बाळपर्वेसी** – कुटुंब, घरदार |
| | | **सर्फराज करणें** – बक्षीस देणे, बढती देणे |
| | | **झडा घालणें** – त्वरा करणे |
| ,, | ८ | **चहा करणें** – तारीफ करणे |
| ७ | १० | **सुतरनाला** – उंटावर वाहून न्यावयाची तोफ |
| ,, | ११ | **रस्त** – रसद, दाणागोटा |
| ,, | १२ | **कुपिया** – गुपित (मूळ फ़ारसी शब्द खुफिया) |
| ,, | १३ | **इतबार** – विश्वास |
| ,, | १४ | **सुवारा** – सुगावा |
| ८ | १६ | **गिराणी** – अडचण, तारांबळ |
| | | **खाडतुर** – चीजवस्तु, सामान |
| | | **बादबरसात** – पावसाळ्यानंतर |
| | | **बहीरबुणगे** – फौजेतील बाजारबुणगे |
| ९ | १७ | **खासखेल** – सेनापतीची वस्त्रे |
| | | **वरतावा** – हल्ला |
| १० | १८ | **तलब** – पगार, तनखा |
| १० | १९ | **मुलाजमत** – भेट |
| | | **एखलास** – मैत्री |
| | | **आवाया** – अफवा |
| ,, | २० | **वारून** – निवारून |
| | | **तसनस** – उद्ध्वस्त |

| लेखांक | पृष्ठ क्र. | शब्दार्थ / टीपा |
|---|---|---|
| ११ | २२ | **पाळेगार** - डोंगराळ प्रदेशात रहाणारे कर्नाटक प्रांतातील लुटारू |
| १२ | २३ | **विखळ** - कमजोर |
| | | **दुरोख** - दोन्हीकडे, दोन दिशांना |
| | | **हलकाई** - गैरकारभार, बेदिली |
| १३ | २४ | **मवास / मवासा** - लुटारू (मूळ अरबी शब्द मवास) |
| | | **चौशां** - चारशे |
| | | **पैवस्तां** - तीन वर्षांपूर्वी |
| ,, | २५ | **मरामत करणें** - चांगल्या स्थितीत राखणे |
| १४ | २७ | **नालीश** - तक्रार, फिर्याद (मूळ फारसी शब्द नालिश) |
| १५ | २८ | **रतावा** - हल्ला |
| १८ | ३३ | **सेल शब्द मानावा** - अंतिम शब्द मानावा |
| २० | ३६ | **अलंकारभूषणें** - बेड्या |
| | | **तरणीचे** - योग्य पद्धतीने चालणे |
| | | *बाईचे बोलणें तरटणीचे फार आहे.* |
| २० | ३७ | **तायी बसणें** - योग्य पद्धतीने चालणे |
| २२ | ४० | **पुरा** - गांवचा भाग, वस्ती |
| २४ | ४४ | **दुराख** - गैरसमज |
| | | **खमीर** - इथे अर्थ; आत्मविश्वास, आब |
| | | *नानांचा खमीर अद्याप बळकट आहे.* |
| ,, | ४५ | **नौदिगर** - चुकीची वर्तणूक |
| | | **परिछिन्न** - निश्चितपणे, हमखास |
| २५ | ४६ | **फंदफरीद** - कटकारस्थान (मूळ फारसी शब्द फंदफरेब) |
| | | **कावित्र** - लबाडी, कावा |
| ,, | ४७ | **सुतरस्वार** - सांडणीस्वार |
| ,, | ,, | **खलेल** - दांडगाई, उद्धट वर्तन |
| २७ | ४९ | **गुदस्तां** - मागे |
| | | **आरीयत** - खंत, शरम |
| ,, | ५० | **धरणीपारणीं** - असहकार, बंड |

| लेखांक | पृष्ठ क्र. | शब्दार्थ /टीपा |
|---|---|---|
| २८ | ५२ | **तकारनामका** - तक्रार<br>*याअर्थी एकांतपत्रें सरकारचीं, राजश्री तात्यांच्या विद्यमानें तकारनामका आलीं होतीं.* |
| | | **कानभ्रष्ट होणें** - कानोकानी जाणे |
| | | **घटवटना** - चर्चा |
| | | **कुरनिशा** - कुर्निसात, मुजरा |
| २९ | ५३ | **पुस्तपन्हाई** - मदत |
| '' | ५४ | **क्षेपनिक्षेप** - न चुकता |
| '' | ५५ | **नाबूद** - बेचिराख |
| ३१ | ६१ | **तडन** - त्रास<br>*देणेदारांची तडन. खर्चासही कांहीं कोठें मिळत नाही.* |
| ३२ | ६२ | **खिलबत** - खलबत, चर्चा |
| '' | '' | **क्षित** - फिकीर, काळजी |
| ३३ | ६५ | **हावभरीं** - लोभयुक्त |
| ३४ | ६८ | **तकरीर** - तक्रार, कैफियत |
| | | **उस्तवाऱ्या** - डागडुजी, दुरूस्ती |
| | | **हुकूमहकम** - स्वामीत्व, ताबा |
| '' | ७० | **परोगतीच्या** - समजुतीच्या |
| ३५ | ७१ | **बिचोबा** - ज्याला मध्ये खांब आहे असा तंबू |
| ३७ | ७६ | **गैरवाका** - चुकीच्या पद्धतीने, लबाडीने<br>*त्यांनी गैरवाका श्रीमंतांस समजाविले.* |
| ३८ | ७८ | **जघन्य** - अपकीर्ती |
| | | **जामेवार** - एक प्रकारचा अंगरखा |
| | | **किनखाप** -बेलबुट्टी केलेले रेशमी कापड |
| ३९ | ८२ | **गरगसे पडणें** - त्रास होणे, संकट उभे रहाणे<br>*देण्याचे फौजेचे व सावकारांचे गरगसे पडले आहेत.* |
| ४४ | ९१ | **बेइतबार** - गैरविश्वास |
| '' | ९२ | **कुन्हा** - सल |
| ४७ | ९६ | **गर्दीस मिळणें** - बेपत्ता होणे |
| | | **फर्जंद** - रक्ताच्या नात्यातील औरस वा अनौरस वंशज |

| लेखांक | पृष्ठ क्र. | शब्दार्थ /टीपा |
|---|---|---|
| ४७ | ९६ | **हक होणें** - मृत्यु पावणे |
| '' | ९७ | **दिक्क होणें** - नाराज होणे, खप्पा होणे<br>*पत्रें ऐकून मर्जी दिक्क जाली.* |
| ५२ | १०८ | **हमराह** - सामील |
| | | **हमवार करणें** - राजी करणे, प्रवृत्त करणे |
| '' | १०९ | **तगीरी बहाली** - कामावरून बडतर्फी व पुन्हा नेमणूक |
| ५४ | ११२ | **तह देणें** - मान्यता देणे, अनुमती देणे |
| ५९ | ११७ | **तहरह** - करार<br>*ते वेळेस सर्व तहरह जाले आहेत.* |
| | | **अंतर्वेद** - गंगा जमुना यांच्या दुआबामधील प्रदेश |
| ६३ | १२२ | **जथ** - जमाव, जूट<br>*चाळीस हजार फौजेचा जथ करून दरमजल आगऱ्याच्या रोखें गेले.* |
| ६७ | १२८ | **आवाडाव** - घुसखोरी, हल्ला<br>*सेंधव्यांत जमियत करून खरगोण वगैरे महालावर आवाडाव करावी, या विचारांत आहां.* |
| ६८ | १२९ | **किलाफ** - संशय, किल्मिष |
| ६९ | १३१ | **सावकाश वाटत नाही** - बरे वाटत नाही |
| | | **लहबार** - लवाजमा, सरंजाम |
| | | **ईनाईतनामा** - जुना संदर्भ |
| | | **महकूफ** - तहकूब, स्थगित |
| | | **मुजाहीम** - अडथळा |
| '' | १३२ | **आडस** - महत्त्व<br>*त्यांच्या पत्रास इतकी आडस पत्रीं नाही.* |
| ७० | १३३ | **अजुर्दा** - नाराज (मूळ फारसी शब्द अजूरदगी)<br>*बाईंची मर्जी सदा अजुर्दा असते.*<br>**धडसू** - गळू, फोड<br>*तीन दिवसपर्यंत एक धडसू झाले होते. आतां बरे आहे.* |
| ७१ | १३५ | **अग्निहोत्र** - अग्नीची उपासना |
| '' | १३६ | **बेजमी** - व्यवस्था |
| ७२ | १३८ | **इतल्ला** - सल्ला, मार्गदर्शन<br>*जे मसलत करणें ते पाटीलबावांच्या इतल्ल्याशिवाय करूं नये.* |

| लेखांक | पृष्ठ क्र. | शब्दार्थ /टीपा |
|---|---|---|
| ७३ | १३९ | **परिहार** - निवारण |
| ८० | १४८ | **जख** - नुकसान |
| | | **सरफराज** - मोठे, स्तुतीयोग्य<br>*पातशहास जख देऊन काय सरफराज झाले?* |
| | | **पसतोलानें** - पिस्तुलाने |
| ८९ | १५८ | **मुजवद** - त्वरेने (मूळ अरबी शब्द मुजरद) |
| ,, | १५९ | **धोरणा** - धोरण |
| ९१ | १६१ | **शहरपन्हा** - शहराची तटबंदी |
| ९४ | १६४ | **सफील** - तटबंदी, किल्ल्याची भिंत<br>*तोफांची चादर लावून किल्ल्याची पन्नास हात सफील पाडून टाकली.* |
| ९६ | १६७ | **बाण** - शिवलिंग |
| ९८ | १७० | **मवासा** - लुटारू, पुंड<br>*ये प्रांतीं मवासांनीं उपद्रव फार दिला आहे.* |
| | | **दिवाल** - भिंत |
| | | **मुस्तकीम** - मजबूत<br>*किल्ल्याचा बंदोबस्त मुस्तकीम केला.* |
| | | **जरदा** - पिवळ्या रंगाचा घोडा वा घोडी<br>*तोफेच्या गोळ्यानें जरदा ठार झाला.* |
| ९८ | १७१ | **तफरीक** - वाटणी<br>*सारे महालावर तफरीक करून ऐवज वसूल करून देऊं.* |
| | | **उजूर** - आक्षेप, तक्रार |
| ,, | १७२ | **इतराजीं** - गैरमर्जी<br>*आधीच तो सेवक यांचे इतराजींत आहे.* |
| १०२ | १७६ | **मजलस** - दरबार |
| १०५ | १८० | **मारू** - विणकाम करणारे, विणकर |
| | | **तसलमात** - खर्चाकरता अनामत रक्कम<br>*दोनचारशें रुपये आम्हाकडे तसलमातीस द्या.* |
| ,, | १८१ | **दुंद** - गाफील |
| १०९ | १८५ | **आटाळा** - उतार, नदी पार करण्याची जागा<br>*आटाळा उतरून रेवापार होऊन दक्षिणतीरीं आले.* |
| ११० | १८७ | **बरराहा** - हक्काने |
| ११२ | १९१ | **बेरूख** - नाराज |

| लेखांक | पृष्ठ क्र. | शब्दार्थ /टीपा |
|---|---|---|
| ११२ | १९१ | **श्लाघ्यता** - ऐट |
| ११४ | १९२ | **चांदणी** - तंबूचा एक प्रकार |
| ११७ | १९६ | **दारमदार** - करार<br>*कांहीं दारमदार करावा, गोहज आपल्याकडेच ठेवावी.* |
| ११८ | १९८ | **टिक्का** - गादीचा हक्कदार (मूळ शब्द टिकाईत) |
| ११९ | २०० | **दिक्कत करणें** - अडचणी सांगणे |
| १२१ | २०३ | **पेशआंदेशी** - वेळेचे भान, समज |
| १२७ | २११ | **असेरीस** - अशीरगडावर |
| १२८ | २१२ | **जमियत** –जमाव |
| १२९ | ,, | **हातेऱ्या** - बिगारी, गडीमाणसे<br>*राहते हवेलीस हातेऱ्या वगैरे यांची तरतूद होत आहे.*<br>**निसबत** - सत्ता, हुकुमत<br>*तिथें नारोपंत यांचीच निसबत.* |
| १३० | २१३ | **इस्तकबील** - पासून पुढें |
| १४७ | २२४ | **बजिन्नस** - प्रत्यक्ष, सोबत |
| १४८ | ,, | **बेवसवास** - त्वरेने, लगोलग |
| १५२ | २२८ | **मुदारत** - आदरसत्कार |
| | | **रूखसत** - प्रस्थान, प्रयाण |
| १६० | २३४ | **मोतादीची** - ठराविक, खात्रीची |
| १६७ | २४० | **बिनाखी** - तपासणी |
| ,, | २४१ | **गुमास्ता** - मुनीम, मुतालिक |
| १६८ | २४२ | **उखाळ** - वांतीचे औषध, काढा |
| १७० | २४३ | **एखलास** - एकच |
| १७१ | २४४ | **निगादास्त** - सुरक्षा |
| १७२ | ,, | **हमराह** - सामील, बरोबर |
| १९१ | २५८ | **वस्तवाणी** - चीजवस्तु, अलंकार |
| २२१ | २८० | **नक्ष** - दरारा, लौकिक |
| २२७ | २८४ | **उजूर** - आक्षेप, तक्रार |
| २२८ | ,, | **तालीक** - नक्कल, प्रत (मूळ अरबी शब्द तालीक) |
| | | **झाडे** - वसुलीचे हिशोब |

| लेखांक | पृष्ठ क्र. | शब्दार्थ /टीपा |
|---|---|---|
| २५१ | ३०१ | **सरबरा** - व्यवस्था<br>*ऐवजाची सरबरा जरूर करून पाठवावी.* |
| ,, | ३०२ | **कमपेष** - कमीअधिक (मूळ उर्दू शब्द कम-ओ-बेश)<br>*त्यास कमपेष पंधरा दिवस होत आले.* |
| २५४ | ३०४ | **दरोबस्त** - एकूण एक |
| २५९ | ३०९ | **आबादानी** - सुखाचा काळ, संपन्नता |
| २६५ | ३१४ | **अराणूक** - व्यस्तपणा |
| २७२ | ३१८ | **बमय** - सोबत |
| २७४ | ३२० | **मालियत** - संपत्ती |
| २८० | ३२४ | **खंगार** - दुर्बळ |
| २८१ | ३२६ | **आवाया** - अडचणी, आपत्ती |
| २८५ | ३२९ | **हरोळी करणें** - सैन्याचा पाठलाग करणे<br>*आम्ही मदतीस येऊन हरोळी करूं.* |
| २८९ | ३३१ | **बलावून** - बोलावून |
| २९२ | ३३४ | **दामोष** - मतलबी, स्वार्थी<br>*असा त्यांचा दामोष विचार आहे.* |
| ३०० | ३३९ | **गलाटा** - गोंधळ, आरडाओरड |
| ३०१ | ३४० | **मुलाजमत** - भेट<br>*पातशहाची मुलाजमत केली, खलबत केलें.* |
| ३०२ | ३४१ | **शंखध्वनी** - आरडाओरडा, गोंधळ |
| ३०३ | ३४२ | **मुजरद** - ताबडतोब, त्वरेने |
| ३०६ | ३४५ | **मालमवेसी** - चीजवस्तू |
| ३२७ | ३६३ | **मावंदें** - गंगापूजन, काशीयात्रा करून घरी आल्यावर देवास नैवेद्य समर्पण, अन्नदान इत्यादी करावयाचा विधी |
| ३२९ | ३६४ | **भगींद्र** - मूळव्याध<br>*शरीरीं समाधान नव्हते. भगींद्राचा उपद्रव फार झाला.* |
| ३३२ | ३६८ | **फाजलें** - गावाभोवती असलेले तट, भिंती<br>**खलेल** - उपद्रव, नुकसान<br>**निस्तुक** - पूर्णपणे |
| ३३३ | ३६९ | **जामग्या** - तोफा डागण्याची वात, काकडा<br>*अंगास जामग्या लाविल्या.* |

| लेखांक | पृष्ठ क्र. | शब्दार्थ /टीपा |
|---|---|---|
| ३३७ | ३७३ | **तकरीर** - तक्रार<br>*त्यांनी तकरीर लिहून दिली.* |
| ३४० | ३७५ | **देहेनगी** - देणगी |
| ३४९ | ३८३ | **वस्तभाव** - चीजवस्तु, सामानसुमान |
| ३५४ | ३८७ | **लगी** - निशाण, झेंडा |
| ३५८ | ३९१ | **दस्तखत** - सही |
| | | **मोकासा** - गांवच्या महसूल वसुलापैकी कांहीं हिस्सा मिळण्याचा हक्क |
| ३६२ | ३९५ | **इस्तावा** - वाढता सारा देण्याची पद्धत |
| ३६५ | ३९९ | **रखणा** - भांडण, वाद |
| ३६९ | ४०५ | **आंदेशा** - हयगय, चालढकल |
| | | **मलई** - दांडगाई, दंगा, बखेडा |
| ३७३ | ४०८ | **हरिद्र** - मनोगत, गुह्य, रहस्य |
| ३७४ | ४०९ | **नि।। (निसबत)** - च्या तर्फेने, दिमत |
| ३७६ | ४११ | **तंगचाई** - तारांबळ |
| ३७७ | ४१२ | **आवग्र** - सतत |
| | | **तेरीख** - महिन्यातील दिवस, मिती |
| ,, | ४१३ | **उपराळा** - खुलासा |
| ३७९ | ४१५ | **फडसूल** - फटकळ<br>*पाराजीपंत तोंडचे फडसूल, याजकरितां लोकांनीं स्थित ठेविली नाही.* |
| | | **अनावली** - दांडगाई, दंगा<br>*तो ऐवज त्यास पावेनासा झाला, म्हणून मागती अनावली करूं लागले.* |
| | | **कही** - सैन्याचा वेढा, कब्जा<br>*कहीवरून राजश्री काशीराव होळकरांचे माणसाशी कजिया जाला.* |
| ३८० | ४१६ | **हा कालवर** - आतापर्यंत |
| ,, | ४१७ | **राख** - रखेल |
| ३८१ | ४१९ | **सारवान** - उंट हाकणारा |
| ३८३ | ४२१ | **जिम्मा** - जबाबदारी |

| लेखांक | पृष्ठ क्र. | शब्दार्थ /टीपा |
|---|---|---|
| ३८४ | ४२३ | **साडे** - लग्नात एक सोहळा असतो. साडे म्हणजे वधूस द्यावयाची साडी. लग्नानंतर चवथ्या दिवशीं ऐरणी पूजनाच्या वेळी वधूवरास वस्त्रें अर्पण करण्याचा सोहळा. |
| ३८७ | ४२९ | **किनखाप** - बेलबुट्टी केलेले रेशमी कापड |
| | | **महमुद्या** - तलम कापड, मखमल<br>*सुभेदारास वस्त्रें, शेला, पागोटें, किनखापी ठाण, महमुद्या चंदेरी दोन याप्रमाणें देऊन बिदा केला.* |
| ३८९ | ४३२ | **कुन्हा** - मर्म<br>*हिशेबाची कुन्हा बाईंस काय समजे ?* |
| ,, | ४३३ | **खटीत** - थकित<br>*खटीत ऐवज, बिना जरब पोहोंचल्याखेरीज पैसा येत नाही.* |
| ३९३ | ४३८ | **वकलांचा** - खात्यांचा, विभागांचा |
| ३९७ | ४४४ | **शेरणी** - नवस फेडण्याकरितां वाटलेली मिठाई, प्रसाद |
| ४०१ | ४४८ | **रूख** - रोख, विचार<br>**तष्ट** - शुक्लकाष्ठ, लचांड<br>*त्यावरून कमाविसदाराचे कारकुनाचे मागें तष्ट.* |



# लेखक परिचय

## श्री. दत्तात्रय बळवंत पारसनीस
## (इ. स. १८७०–१९२६)

रावबहादूर दत्तात्रय बळवंत पारसनीस हे आरंभीच्या साने, वासुदेवशास्त्री खरे, वि. का. राजवाडे या महाराष्ट्राच्या इतिहाससंशोधकांचे समकालीन असे एक थोर संशोधक होते. इतिहास या विषयावर विविध प्रकारे लेखन करून महाराष्ट्राच्या इतिहासात त्यांनी मौलिक भर घातली आहे. त्यांच्या कार्याचे मूल्यमापन करताना वंग इतिहासकार जदुनाथ सरकार यांनी मोठे गौरवोद्गार काढले आहेत. ते म्हणतात, ''इतिहास संशोधनाची पहिली आणि अगदी अनिवार्य आवश्यकता म्हणजे अस्सल दस्तऐवजांची उपलब्धता. ऐतिहासिक राजपत्रे आणि इतर साधने यांचा संग्रह करणारी इतिहासप्रेमी व्यक्ती आपल्या कार्याने संशोधकाला तर मदत करतेच, पण त्याचबरोबर इतरत्र विखुरलेल्या कागदपत्रांचे एकत्रीकरण करून आणि त्यांचे विनाशापासून संरक्षण करून उगवत्या पिढीतील संशोधकांवर फार मोठे उपकार करते. तसेच कागदांचा संग्रह करीत असताना त्यातील महत्त्वाचे कागद त्या व्यक्तीने प्रसिद्ध केले तर त्यामुळे स्थानिक अभ्यासकांचा तर फायदा होतोच, पण त्या साधनांचा मोठ्या प्रमाणावर प्रसार झाल्यामुळे त्याचा कदाचित जगातील अनेक संशोधकांना लाभ उठविता येतो. ''मराठ्यांच्या इतिहासाच्या जिज्ञासूंचे फार मोठे उपकारकर्ते''या शब्दांत जदुनाथ सरकारांनी रावबहादूर पारसनिसांच्या कार्याचा गौरव केला आहे. पारसनिसांनी केवळ स्व:साठी अस्सल साधने जमविली नाहीत तर संशोधकांना अनेक प्रकारे मदत केली.

पुण्याच्या अभिलेखागारातील पेशव्यांची कागदपत्रे न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे यांच्या सौजन्याने पारसनिसांना पाहावयास मिळाली आणि काही इंग्रज अधिकाऱ्यांच्या मदतीने त्यांनी भारतीय संस्थानिकांची कागदपत्रेही मिळविली. त्यांचा संग्रह केला, ती व्यवस्थित लावून ठेवली आणि त्यांचे संपादन करून ती प्रसिद्धही केली. त्यामुळे मराठ्यांच्या इतिहासाच्या अभ्यासकांची फार मोठी सोय झाली.

सातारा जिल्ह्यातील बोरगाव या खेडेगावात २७ नोव्हेंबर १८७० रोजी एका मध्यमवर्गीय ब्राह्मण कुटुंबात पारसनिसांचा जन्म झाला. त्यांचे शिक्षण बेताचेच जाले होते. मुंबई विद्यापीठाची शालान्त परीक्षादेखील ते पूर्ण करू शकले नव्हते. परंतु अगदी लहानपणापासूनच त्यांनी मराठी साहित्य आणि मराठ्यांचा इतिहास या विषयात रस घेण्यास सुरुवात केली होती. वयाच्या १७ व्या वर्षी त्यांनी कृष्णाजी नारायण आठल्ये (इ. स. १८५२–१९२७) या 'केरळ कोकिळ' या मासिकाच्या संपादकाचे अनुकरण करून 'महाराष्ट्र कोकिळ' नावाचे एक मासिक पत्र १८८७ साली सुरू केले होते. या १६ पानी मासिकात इतिहासप्रसिद्ध व्यक्तींची शब्दचित्रे आणि सर्वसामान्य लोकांना आवडतील अशा प्रासंगिक गोष्टी, आख्यायिका यांचा समावेश केला जात असे. या मासिकाची वार्षिक वर्गणी एक रुपया होती आणि त्याचे सुमारे २००० वर्गणीदार होते. परंतु, पुरेशा भांडवलाअभावी त्यांना हा उपक्रम १८९२ साली बंद करावा लागला. परंतु इतिहास आणि साहित्य या विषयांत रस घेणाऱ्या वाचकांचे लक्ष या मासिकाने वेधून घेतले होते. अर्थात याआधी साने, खरेशास्त्री, राजवाडे या संशोधकांनी लोकांमध्ये जी वाचनाची आवड निर्माण केली होती, तिचा पारसनिसांना बराच फायदा झाला. पारसनिसांनी 'झाशीची महाराणी लक्ष्मीबाईचे चरित्र' हा आपला पहिला ग्रंथ १८९४ साली प्रसिद्ध केला आणि तो वाचकांच्या पसंतीस तर उतरलाच, पण केसरीचे संपादक लोकमान्य टिळक यांनीदेखील आपल्या मुखपत्रातून त्याची मुक्तकंठाने स्तुती केली. त्यामुळे पारसनीस सामान्य जनतेचे लोकप्रिय लेखक बनले. अर्थात, या लोकप्रियतेमुळे कागदपत्रांचे संकलन, ऐतिहासिक हस्तलिखितांचे, कागदपत्रांचे आणि चर्चांचे, टिप्पणांचे प्रकाशन आणि तत्सम कार्य करण्याच्या आपल्या आवडत्या छंदाला त्यांनी मुरड घातली नाही.

समकालीन प्रसिद्ध मराठी कादंबरीकार हरी नारायण आपटे (इ. स. १८६४–१९१९) यांच्या सहकार्याने त्यांनी 'भारतवर्ष' नावाचे नियतकालिक १८९६ साली सुरू करून आपल्या अंगीकृत कार्याची मुहूर्तमेढ रोवली. परंतु 'भारतवर्ष' मासिक हा प्रयत्न काही कारणांमुळे फारसा यशस्वी झाला नाही आणि एका वर्षातच हे मासिक बंद करावे लागले. परंतु, या छोट्या कालावधीत पारसनिसांनी बखरी, ऐतिहासिक दस्तऐवज, वंशावळी, कैफियती आणि मराठ्यांच्या इतिहासासंबंधतीची माहिती प्रसिद्ध करण्याची कौतुकास्पद कामगिरी केली होती.

'भारतवर्षा'च्या प्रथम अंकात त्यांनी आपल्या कार्यक्रमाची, उद्देशांची रूपरेखा वाचकांना सादर केली होती. यामध्ये त्यांनी सर्वप्रथम ऐतिहासिक साधनांचे संकलन, संग्रह

करण्याचे महत्त्व प्रामुख्याने विशद केले होते आणि इतिहासलेखनाला दुसरा क्रम दिला होता. प्रस्तुत संदर्भात त्यांनी का. ना. साने, वासुदेवशास्त्री खरे, वि. का. राजवाडे या आपल्या पूर्वसूरींनी घालून दिलेल्या मार्गाचे अनुकरण करून ''कोणी भावी भारताचा इतिहासकार (कार्लाइल) जो या मराठ्यांच्या इतिहासाच्या सुकलेल्या हाडांच्या सापळ्यात रक्तमांस आणि विश्वसनीयता यांचा पुरवठा करून त्यावर वस्त्रप्रावरणे घालेल'' अशी उमेद व्यक्त केली आहे.

'भारतवर्ष' मासिक १८९७ साली बंद पडल्यावर 'इतिहाससंग्रह' ही आपली प्रसिद्ध मासिकमाला सुरू करण्यासाठी पारसनिसांना सुमारे आठ वर्षांचा दीर्घकाळ कंठावा लागला. १९०८ साली 'इतिहाससंग्रह' या नियतकालिकाची स्थापना करून पुढील आठ वर्षांत म्हणजे १९१६ सालापर्यंत त्यांनी विविध प्रकारची ऐतिहासिक माहिती लेखसंग्रह' आणि वि. का. राजवाडे यांचे 'मराठ्यांच्या इतिहासाची साधने' या इतिहासाला वाहिलेल्या मालिकांप्रमाणेच 'इतिहाससंग्रह' या पारसनिसांच्या मालिकेने विसाव्या शतकाच्या प्रारंभीच्या काळात मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनसामग्रीत फार मौलिक स्वरूपाची भर घातली. 'इतिहाससंग्रहात' प्रसिद्ध झालेले महत्त्वाचे विषय असे होते– 'जुने ऐतिहासिक वाद, ३ भाग, ऐतिहासिक टिपणे ७ भाग, संकीर्ण ऐतिहासिक लेख २ भाग याखेरीज राजवाड्यांच्या 'मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांचे १६, १७, १८, १९ आणि २२ हे पाच खंड, महेश्वर दरबारची बातमीपत्रे, २ खंड, महापुरुष ब्रह्मेंद्र स्वामी धावडशीकर, चरित्र व पत्रव्यवहार, महादजी शिंदे ऊर्फ पाटीलबाबा यांचा अस्सल पत्रव्यवहार, महादजी शिंदे यांजकडील राजकारणे, होळकर दरबारातील हिंगण्यांची वकिली इत्यादी मराठ्यांच्या इतिहासाशी संबंधित सुमारे सहा हजार ऐतिहासिक दस्तऐवज या 'इतिहास संग्रहातून' पारसनिसांनी संकलित केला आहे. या प्रकरणाच्या शेवटी त्यांच्या ग्रंथसंपदेची जी यादी दिली आहे त्यावरून ऐतिहासिक साधनसामग्री जमा करणे, त्याच्यावर संपादकीय संस्कार करून ते प्रसिद्ध करणे आणि असे करीत असताना अनेक अडचणींना सामोरे जाणे आणि समकालीनांच्या टीकेची तमा न करता एवढे प्रकाशन करणे यासाठी पारसनिसांनी केलेल्या परिश्रमांचे इतिहासाच्या अभ्यासकांनी कौतुकच केले पाहिजे.

पारसनीस हे फार धूर्त आणि चतुर होते. आपल्या ध्येयपूर्तीसाठी दक्षिण भारतातील अनेक संस्थानिकांशी त्यांनी मैत्रीचे संबंध जोडले होते. संस्थानिकांना आवश्यक ती त्यांच्या संस्थानच्या इतिहासाची माहिती ते मोठ्या तत्परतेने पुरवीत. 'इतिहाससंग्रह' सुरू करण्यापूर्वीच्या काळात त्यांना काही विशेष काम नव्हते. त्याकाळात ते कोल्हापूरचे छत्रपती राजर्षि शाहूमहाराज यांच्यासमवेत इंग्लंडचा राजा, सातवा एडवर्ड यांच्या राज्यारोहण समारंभासाठी गेले होते. या संधीचा फायदा घेऊन मुंबई इलाख्याच्या सेवेतून निवृत्त झालेल्या इंग्रज अधिकाऱ्यांच्या गाठीभेटी घेण्यास त्यांनी प्रारंभ केला आणि त्यांच्याकडून पुण्याच्या पेशवे दफ्तरात काम करण्यासाठी शिफारसपत्रे मिळविली. तसेच डलहौसी, हेन्री लॉरेन्स, निकोलसन, लॉर्ड एलिनबरो, हार्डिंग्ज आणि इतर ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या काही खाजगी

पत्रव्यवहाराच्या फायलीही मिळविल्या.

मराठी राज्याच्या उत्तरार्धातील एक प्रमुख मुत्सद्दी म्हणून नाना फडणीस या पेशव्यांच्या कारभाऱ्याची ब्रिटिशांनी देखील स्तुती केली आहे. पामर हा ब्रिटिश रेसिडेंट म्हणतो, ''नाना फडणीस म्हणजे मराठी राज्याचा 'शहाणपणा' अथवा 'नेमस्तपणा' याचे प्रतीक होय.'' मराठ्यांचा इतिहासकार ग्रँट डफ म्हणतो, ''मराठा राष्ट्राने निर्माण केलेला नाना फडणीस हा शेवटचा कुशाग्र बुद्धीचा, तेजस्वी मुत्सद्दी होय.'' या नाना फडणिसाचा खाजगी पत्रव्यवहार, सातारा जिल्ह्यातील, वाई तालुक्यातील कृष्णा नदीच्या तीरावरील मेणवली या गावी होता. नाना फडणिसावर शेवटच्या पेशव्याची, दुसऱ्या बाजीरावाची गैरमर्जी झाल्याने त्याला कारभारीपदावरून दूर केले होते. नानाच्या जेव्हा हे लक्षात आले तेव्हा त्याने आपला महत्त्वाचा राजकीय पत्रव्यवहार 'मेणवली' या आपल्या गावी नेला होता. परंतु, १८०० साली त्याचा मृत्यू झाला आणि त्याच्या वारसदारांनी त्याकडे पूर्ण दुर्लक्ष केले. पारसनीस यांना या 'मेणवली' दप्तराची आणि त्यातील महत्त्वपूर्ण ऐतिहासिक कागदपत्रांची पूर्वकल्पना होती. त्यामुळे युक्तिप्रयुक्तीने विविध मार्गांचा अवलंब करून त्यांनी ते सारे दफ्तर हस्तगत केले आणि नानाच्या वंशजांनी त्याची विल्हेवाट लावण्यापूर्वी आणि त्या दप्तराचा संपूर्ण नाश होण्यापूर्वी ते सुरक्षितपणे जतन करून ठेवले. या संग्रहातून महत्त्वाचे दस्तऐवज निवडून त्यांनी ते आपल्या 'इतिहाससंग्रहातून' क्रमशः प्रसिद्ध करण्यास प्रारंभ केला.

१८४८ साली ब्रिटिशांनी 'सातारा राज्य' खालसा केले, त्यामुळे सातारकरांच्या वाड्यातील सरकारी कागदपत्रांचे काय करावयाचे यासंबंधी गोंधळाची परिस्थिती निर्माण झाली होती. सातारा राजाच्या संग्रहात शिवकालापासूनचे अनेक महत्त्वाचे ऐतिहासिक कागदपत्र, जुनी चित्रे, नाणी, विविध प्रकारच्या वस्तू आणि इतर अनेक गोष्टी यांचा भरणा होता. ग्रँट डफने आपल्या इतिहासासाठी या संग्रहातील अस्सल साधनांचा पुरेपूर उपयोग करून घेतला होता. परंतु राजाच्या वंशजांना हा ऐतिहासिक वारसा कसा जतन करावयाचा, त्याची देखभाल कशी करावयाची हा मोठा प्रश्न होता. शिवाय राज्य खालसा झाल्यामुळे त्यांना पैशांचीही निकड होती. पारसनिसांना जेव्हा सातारकर आपला ऐतिहासिक खजिना निकालात काढणार असल्याची बातमी समजली तेव्हा ते फार अस्वस्थ झाले. परंतु त्यांच्याकडे द्रव्य नव्हते, कोणाचे पाठबळ नव्हते, हा संग्रह कोणा अपात्र व्यक्तीच्या हाती पडून त्याची अयोग्यरीत्या विल्हेवाट लागू नये यासाठी हवा असलेला जनतेचा पाठिंबाही त्यांना नव्हता. त्यांच्या या अवस्थेचे वर्णन करताना जदुनाथ सरकार म्हणतात, ''परंतु त्यांच्या मनाने आणि बुद्धीने इतिहासाची ही साधने मिळविण्याचा सतत ध्यास घेतला होता आणि प्रचंड सहनशीलता आणि हरहुन्नरीपणा दाखवून त्यांनी या संग्रहाचा बराचसा भाग, मुंबईचे धनिक पु. वि. मावजी यांच्या आर्थिक साहाय्याने मिळविला.''

ऐतिहासिक साधने जमा करण्याचा छंदच पारसनिसांना लागला होता. ग्वाल्हेरचे शिंदे आणि इंदूरचे होळकर यांच्या घराण्यातील कागदपत्रांनी त्यांचे लक्ष वेधून घेतले. राजवाडे

यांनी आपल्या लेखाद्वारे या संस्थानिकांना त्यांच्या पदरी असलेल्या कागदपत्रांचे महत्त्व पटवून देणे आणि ती जमा करणे किती कठीण काम आहे याची कल्पना दिली होती.

पारसनीस हे आशावादी आणि प्रयत्नवादी होते. त्यांनी प्रथम पूर्वीच्या इंदूर संस्थानच्या अधिकाऱ्यांची भेट घेतली, पण त्यांनी त्यांची कागदपत्रांची मागणी काही जुजबी कारणे सांगून धुडकावून लावली. तेव्हा त्यांनी इंदूरच्या अधिकाऱ्यांवर वरून दबाव आणण्याचा निश्चय केला. लंडनच्या वास्तव्यात १९०२ साली त्यांना भेटलेल्या एका निवृत्त अधिकाऱ्याच्या मदतीने भारत सरकारकडे त्यांनी आपली मागणी पोहोचविली. या प्रयत्नांचा योग्य तो परिणाम झाला आणि त्यांना इंदूर संस्थानची कागदपत्रे तपासण्याची परवानगी मिळाली. परंतु, पारसनीस याबाबतीत काहीसे दुर्दैवी ठरले. पारसनीस इंदूरला पोहोचण्यापूर्वीच तेथील राजवाड्याला अचानक अग्नी लागून तेथील सर्व कागदपत्रे जळून नष्ट झाली.

ग्वाल्हेरच्या संस्थानिकांकडून महादजी शिंद्यांचे कागदपत्र मिळविण्यात त्यांना यश प्राप्त झाले आणि ते त्यांनी 'इतिहाससंग्रहातून' क्रमशः प्रसिद्ध केले. या साधनांचे एकूण पाच खंड प्रसिद्ध झाले.

**ऐतिहासिक वस्तुसंग्रहालय :**

ऐतिहासिक वस्तुसंग्रहालयाचे पारसनिसांना फार मोठे आकर्षण होते. कदाचित आपल्या १९०२ सालच्या इंग्लंडच्या भेटीत त्यांना ब्रिटिश म्युझियम, इंडिया ऑफिस लायब्ररी आणि अशाच इतर संस्था पहावयास मिळाल्या होत्या. त्यामुळे ते प्रभावित झाले असावेत. 'इतिहाससंग्रह' मासिक हे स्वतःच्या पायावर उभे झाल्यानंतर त्यांनी सातारा येथे एक ऐतिहासिक वस्तू संग्रहालय स्थापन करण्याचा प्रकल्प हाती घेतला. या कामासाठी त्यांनी तत्कालीन मुंबई सरकारकडे, 'भारताच्या इतिहासाच्या कार्यासाठी' आर्थिक साहाय्य करण्याची विनंती केली. ४ डिसेंबर १९१२ रोजी सरकारला सादर केलेल्या विनंतिपत्रात त्यांनी संशोधकांना एकत्रित संदर्भ ग्रंथ आणि ऐतिहासिक वस्तू मिळत नसल्याने किती त्रास होतो याची कल्पना देऊन अशा एखाद्या वास्तूची गरज कशी आहे हे पटवून देण्याच प्रयत्न केला होता. प्रस्तुत संदर्भात आपले स्वतःचे अनुभव मांडले होते. शेवटी त्यांनी सरकारला अशी कळकळीची विनंती केली होती की, जन्मभर आपण ती ऐतिहासिक सामग्री मिळविली ती एका छत्राखाली सुरक्षित राहील आणि ती अभ्यासकांना उपलब्ध होईल याची जबाबदारी सरकारने स्वीकारावी.

मुंबई सरकारने या विनंती अर्जाचा सहानुभूतीपूर्वक विचार करून १९१४ साली एका ठरावाद्वारे पारसनिसांना आर्थिक साहाय्य देण्याचा निश्चय केला. परंतु, याच सुमारास पहिल्या महायुद्धाचा भडका उडाल्याने त्या ठरावाची कार्यवाही होण्यास विलंब लागला. नंतरच्या काळात १९१४ साली घेतलेल्या निर्णयात अंशतः बदल करून 'कागदपत्रें' आणि

'ऐतिहासिक वास्तू' यासाठी दोन स्वतंत्र इमारती बांधाव्यात असा निर्णय सरकारने घेतला. ऐतिहासिक कागदपत्रांसाठी बांधावयाच्या इमारतीची संपूर्ण जबाबदारी सरकारने स्वीकारली आणि ते काम पूर्ण केले. मुंबई सरकारचे तत्कालीन गव्हर्नर सर लेस्ली विल्सन यांनी ३ नोव्हेंबर १९२५ रोजी या वास्तूचे उद्घाटन केले. या संग्रहालयात पारसनिसांनी मिळविलेले २० हजार मराठी कागदपत्र, ५ हजार इंग्रजी पत्रव्यवहार आणि सुमारे ३ हजार युरोपीय भाषांतील, १७ व्या आणि १८ व्या शतकातील इतिहासासंबंधीच्या पुस्तकांची प्रतिष्ठापना करण्यात आली.

पेशवा माधवराव पहिले, रघुनाथराव, नाना फडणीस, सखारामबापू बोकील, हरीपंत फडके, महादजी शिंदे, परशुरामभाऊ पटवर्धन आणि पानिपतोत्तर काळातील इतर व्यक्तीसंबंधीचे पारसनिसांनी विकत घेतलेले अथवा मिळविलेले कागदपत्र या संग्रहालयात ठेवण्यात आले होते. याखेरीज पारसनिसांनी लंडनच्या आपल्या वास्तव्यात संपादन केलेले मद्रासचा गव्हर्नर मॅकर्टने (इ. स. १७८०-८५) यांच्याकडील १७२० ते १८१८ या कालखंडावर प्रकाश टाकरणारे सुमारे ५ हजार कागद या संग्रहात होते. कालांतराने या संग्रहालयातील बरेचसे कागद मुंबई सरकारने विकत घेऊन ते १९३९ साली डेक्कन कॉलेजची पुनर्रचना झाल्यावर मराठ्यांच्या इतिहासाच्या अभ्यासासाठी त्या संस्थेकडे जतन करण्यास दिले. उर्वरित भाग पारसनिसांकडेच राहिला आणि नंतर तो डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद या संस्थेने पारसनिसांच्या वंशजांकडून खरेदी केला. या उर्वरित संग्रहात प्रामुख्याने काही ऐतिहासिक चित्रे, नाणी, कलेच्या वस्तू, जुनी हत्यारे, बाजीराव, शाहू महाराज, राजारामांचे पुत्र शिवाजीराजे, महादजी शिंदे, नाना फडणीस आणि इतर व्यक्तींची चित्रे आहेत. हा भाग साताऱ्याच्या नव्या ऐतिहासिक वास्तूकडे दिला नव्हता. पारसनिसांच्या १९२६ साली झालेल्या निधनामुळे तो त्यांच्या वारसाकडे राहिला होता. त्यामुळे त्यांना तो स्वतंत्रपणे विकता आला.

वास्तविक पारसनीस काही सरकारी सेवेत नव्हते. परंतु, त्यांनी केलेल्या इतिहासाच्या कार्याची दखल घेऊन मुंबई सरकारने त्यांना इ. स. १९२२ पासून दरमहा ३०० रुपये निवृत्तिवेतन मंजूर केले होते आणि त्यांच्या मृत्यूनंतर एक विशेष बाब म्हणून त्यांचे पुत्र अमृतराव यांना सालिना २४०० रुपये आर्थिक साहाय्य देण्याचे मान्य केले. सरकारी शाळा आणि संस्था यांना 'इतिहाससंग्रहा'चे वर्गणीदार बनवून सरकारने एक प्रकारे पारसनिसांच्या कार्याला हातभार लावला होता.

**पारसनीस आणि पेशवे दप्तर :**

पारसनिसांच्या कार्याची सरकारने चांगलीच दखल घेतली होती. न्यायमूर्ती म. गो. रानडे यांनी सर्वप्रथम त्यांना पुण्याच्या पेशवे दफ्तरात प्रवेश मिळवून दिला. पेशवे दफ्तरातील एक अधिकारी गणेश चिमणाजी वाड यांनी पेशवे दफ्तरातील निवडक कागदपत्रांचे काही

खंड प्रकाशनासाठी तयार केले होते. पुण्याच्या डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्सलेशन सोसायटीने ग. चि. वाड यांनी तयार केलेले खंड छापून प्रसिद्ध करण्याची तयारी दर्शविली. वाड यांनी सरकारकडून या खंडांच्या प्रसिद्धीकरणाची परवानगी मिळविली होती. डे. व्ह. सोसायटीने पहिले सहा खंड प्रथम छापण्याची तयारी दर्शविली. या सहा खंडांची पृष्ठसंख्या ५३०० इतकी होती. दादासाहेब करंदीकर, सहस्रबुद्धे आरि पारसनीस या तीन सातारकरांच्या सहकार्याने सहस्रकर प्रेसने १९०२-३, डे. व्ह. सोसायटीसाठी ते प्रसिद्ध केले आणि ९ वा खंड १९११ साली प्रसिद्ध झाला. या ९ खंडांपैकी पहिले ३ खंड पारसनीस आणि वाड यांच्या संयुक्त नावाने प्रसिद्ध झाले. या तीन खंडात प्रामुख्याने छत्रपती शाहूमहाराज आणि बाळाजी बाजीराव पेशवे यांच्या संबंधीचे कागद आहेत. बाकी ६ खंडांच्या संपादनासाठी वाड यांना का. बा. मराठे (खंड ४, ६, ८) बा. पू. जोशी (खंड ५, ७) आणि का. ना. साने (खंड ९) यांचे सहकार्य लाभले. या खंडांना 'रोजनिशी' असे म्हणत. या रोजनिशींचे महत्त्व विशद करताना न्यायमूर्ती रानडे म्हणतात, ''महाराष्ट्राच्या इतिहासाच्या अत्यंत महत्त्वाच्या घटनांच्या कालखंडाच्या इतिहासलेखनाच्या कामी अत्यंत उपयुक्त अशी माहिती या राजनिर्शीमधून मिळते.

### किंकेड आणि पारसनीस : मराठ्यांचा इतिहास

सी. ए. किंकेड (१८७०-१९५४) हे एक ब्रिटिश सनदी अधिकारी होते. सरकारी सेवेतील त्यांचा बराचसा काळ महाराष्ट्रात गेल्यामुळे त्यांना मराठ्यांच्या इतिहासाबद्दल विशेष आकर्षण निर्माण झाले होते. मराठ्यांचे आजवर लिहिलेले इंग्रजी भाषेतील इतिहास फारसे समाधानकारक नाहीत असे त्यांना वाटत होते. ग्रँट डफचा 'मराठ्यांचा इतिहास' हा ग्रंथही त्यांच्या मते फारसा समाधानकारक नव्हता. त्यामुळे आपल्या प्रशासकीय अनुभवाचा उपयोग करून मराठ्यांचा इतिहासकार यांच्या सहकार्याने हे काम करावे असे त्यांना वाटत होते. त्या काळात ब्रिटिश सरकारच्या संपर्कात असलेल्या रावबहादूर पारसनीस यांची मदत घ्यावी, असे त्यांनी मनाशी योजून त्यांच्याशी बोलणी सुरू केली. पारसनिसांनी जेव्हा त्यांच्या विनंतीचा स्वीकार केला तेव्हा १६ सप्टेंबर १९१३ च्या पारासनिसांना लिहिलेल्या पत्रात ते म्हणतात, ''तुम्ही मोठ्या उदारपणे मला जे सहकार्य देण्याचे मान्य केले आहे त्यामुळे मला माझी योजना सादर करण्याचे धैर्य होत आहे. इतिहासलेखन करताना अर्थात मी आपण जी मदत कराल त्याचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख करीन आणि मी एकतर माझा हा इतिहासग्रंथ आपणास अर्पण करीन अथवा ग्रंथावर माझ्या नावाबरोबर तुमच्या नावाचाही सहलेखक म्हणून उल्लेख करीन. यापैकी तुम्हाला कोणता पर्याय पसंत असेल त्याचा मी स्वीकार करीन.''

नंतरच्या काळात पारसनीस आणि किंकेड यांच्यात जो पत्रव्यवहार झाला त्यावरून पारसनिसांनी किंकेड यांना त्यांच्या लेखनात कशा प्रकारचे साहाय्य केले याची कल्पना

येते. पारसनिसांनी अनेक मराठी साधने एकत्र करून शंकर केशव महाबळेश्वर या उत्तम इंग्रजी जाणणाऱ्या व्यक्तीकडून या साधनांचे इंग्रजीत भाषांतर करून घेतले व ती सामग्री किंकेडला पुरविली. तसेच प्रकाशित मराठी साधने जमा करण्याच्या कामी किंकेडला महत्त्वपूर्ण सहकार्य केले. इतिहासलेखनाचे हे काम पूर्ण करण्यास किंकेडला सुमारे ११ वर्षे द्यावी लागली आणि अशा रीतीने सिद्ध झालेला हा इतिहास ३ खंडांत १९१८ ते १९२५ या कालखंडात प्रसिद्ध झाला.

**मूल्यमापन :**

इतिहासाचार्य वि. का. राजवाडे यांनी पारसनिसांनी केलेल्या मेणवली दफ्तराच्या प्रकाशनाबद्दल आणि पुरुषोत्तम विश्राम मावजी या धनिकाच्या साहाय्याने पेशवे दफ्तरातील 'मराठ्यांच्या इतिहासाची साधने' खंड ११ च्या प्रस्तावनेत ते म्हणतात, ''उदाहरणार्थ, रा. पारसनीस यांचीच गोष्ट घ्या. शेट पुरुषोत्तम विश्राम मावजी या भाटिया गृहस्थाच्या साहाय्याने रा. पारसनीस यांनी 'इतिहाससंग्रह' नामक ऐतिहासिक मासिक पुस्तकाच्याद्वारा नानांचे दफ्तर प्रसिद्ध करण्याचा उपक्रम केला आहे. मावजी शेट यांना हिंदुस्थानच्या इतिहासाचा उत्कट अभिमान असून मराठ्यांच्या इतिहासाशी तर त्यांचे इतके विलक्षण तादात्म्य झालेले आहे की, महाराष्ट्र वीरपुरुष जो शिवाजी त्यांच्या चरित्राचा त्यांनी केवळ निदिध्यास धरला आहे. घरी, दारी, स्वप्नात व जागृतीत ते शिवाजीइतकी दुसऱ्या कोणत्याच वस्तूची भक्ती करीत नाहीत. अशा नि:सीम देशभक्ताचे साहाय्य रा. पारसनीस यास मिळाले आहे.''

जदुनाथ सरकार यांनीदेखील पारसनिसांची मुक्त कंठाने स्तुती केली आहे. पारसनीस म्हणजे मराठ्यांच्या इतिहासाच्या सर्व अभ्यासकांचे 'उपकारकर्ते' असे सरकार त्यांना मानत असत. सरकारी दस्तऐवजांचे विशेषत: मेणवली येथील नाना फडणविसांच्या कागदपत्रांचे संग्राहक, त्यांचे संपादक आणि प्रकारशक या नात्याने संशोधकांची निश्चितपणेच फार मौलिक स्वरूपाची सेवा केली आहे असे सरकार म्हणतात.

पारसनिसांचा मित्रपरिवार मोठा होता. त्यांना शत्रू असे फारसे कोणी नव्हते. लोकमान्य टिळक, ऐतिहासिक कादंबरीकार हरी नारायण आपटे या समकालीन श्रेष्ठ व्यक्तींची मर्जी त्यांनी संपादन केली होती. तसेच समकालीन इतिहास-संशोधक का. ना. साने, वासुदेवशास्त्री खरे, इतिहासाचार्य वि. का. राजवाडे, जदुनाथ सरकार, रियासतकार सरदेसाई हे त्यांचे मित्रही होते आणि प्रसंगी टीकाकारही होते.

आपण जे ऐतिहासिक साहित्य जमा करू ते लोकांच्या, अभ्यासकांच्या निदर्शनास आणले पाहिजे या राजवाड्यांच्या भूमिकेपासून प्रेरणा घेऊन पारसनिसांनी अधिकाधिक ऐतिहासिक साधनसामग्री प्रसिद्ध करण्याचे प्रयत्न केले. नव्याने प्रस्थापित झालेल्या सरकारी ऐतिहासिक दस्तऐवज आयोग या संस्थेचा जास्तीत जास्त फायदा उठवून इ. स. १९२१ ते १९२५ या काळात त्यांनी ऐतिहासिक साधनसामग्रीविषयी अनेक शोधनिबंध आयोगाला सादर केले. मुंबईच्या 'एशियाटिक सोसायटी'च्या शताब्दीच्या निमित्ताने १९०५ साली प्रसिद्ध

झालेल्या संस्थेच्या मुखपत्रात त्यांनी इतिहासविभागात मराठ्यांच्या इतिहासासंबंधीचे लेखन या विषयावर एक चिकित्सक दीर्घ निबंध सादर केला. थोडक्यात, मिळालेली एकही संधी न दवडता मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनसामग्रीच्या प्रचंड ठेव्याकडे विद्वानांचे लक्ष वेधण्याचे प्रयत्न केले.

थोडक्यात, असे म्हणता येईल की, २० व्या शतकात महाराष्ट्रात इतिहासाच्या संशोधनाला जी चालना मिळाली त्याचे सारे श्रेय साने, खरे, राजवाडे आणि पारसनीस या चार आधारस्तंभांना दिले पाहिजे. इतिहासलेखनापूर्वी अस्सल साधनांचा संग्रह करणे, तो ठेवा जतन करणे या प्रक्रियेला प्राधान्य दिले पाहिजे अशी त्यांची विचारसरणी होती.

## पारसनिसांची ग्रंथसंपदा

**(अ) मासिके (संपादक)**

१. महाराष्ट्र कोकिळ (इ. स. १८८७-१८९२) वार्षिक पृ. १६ वर्गणी १ रुपया

२. भारतवर्ष (ह. ना. आपटे-सहसंपादक) (इ. स. १८९८-१९००) एकूण प्रकाशित खंड २४, वार्षिक वर्गणी ४२ रुपये.

**(ब) पेशवे दफ्तरातील कागदपत्र** (संपादक) रावबहादूर गणेश चिमणाची वाड, नेटिव्ह असिस्टंट टू द कमिशनर, मध्य विभाग, यांनी साताऱ्याचे राजे आणि पेशव्यांच्या रोजनिशी यांमधून निवडलेले कागद.

वाड आणि पारसनीस (संपादक)

खंड १ शाहू छत्रपती, पुणे, १९०५

खंड २ बाळाजी बाजीराव पेशवा, भाग १, पुणे, १९०३

खंड ३ बाळाजी बाजीराव पेशवा, भाग २, पुणे, १९०५

पारसनीस आणि मावजी (संपादक)

खंड १० दक्षिणेतील सरदारांच्या कैफियती, पुणे, १९०८

खंड ११ सनदापत्रातील माहिती, पुणे, १९१३

खंड १२ तह व करारमदार, पुणे, १९४२

खंड १३ वतनपत्रे, निवाडापत्रे, पुणे, १९०९

पारसनीस (एकट्याने संपादित केलेले खंड)

खंड १४ पेशवे दफ्तरातील सनदापत्रांतील माहिती, पुणे, १९१७

खंड १५ फौज सरंजामाची माहिती, पुणे, १९१५

**(क) मेणवली दफ्तरातील कागदपत्रांचे संपादन**

१. वाक्यपुष्पांजली : अथवा राष्ट्रीय सभेसंबंधी स्वदेशबांधवांस प्रेमपूर्वक चार शब्द १८८९, पृ. ५१

२. भारत कीर्तिध्वज : १८९२च्या अलाहाबादच्या काँग्रेस सभेचे वर्णन, १८९१, पृ. ५६
३. कीर्तिमंदिर, १८९०, पृ. ४७
४. दिल्ली अथवा इंद्रप्रस्थ, १९०२, पृ. ९८
५. अयोध्येचे नबाब, १८९९, पृ. १५४
६. गोविंदपंत बुंदेल्यांची कैफियत (सं), १८९७, पृ. २१
७. श्रीमंत महाराज शिंदे सरकार शकावली, १९११, पृ. ३९
८. दिल्ली येथील मराठ्यांची राजकारणे
भाग १, १९१३, पृ. ३२२
भाग २, १९१४, पृ. २०१
९. महादजी शिंदे ऊर्फ पाटीलबाबा यांचा अस्सल पत्रव्यवहार भाग १, पृ. १४४, भाग २, पृ. १३२
१०. महादजी शिंदे याजकडील राजकारण
भाग ३, पृ. १९८, भाग ४, पृ. ९८, भाग ५, पृ. २१७
११. महेश्वर दरबारची बातमीपत्रे
भाग १, १९१०, पृ. २४५, भाग २, १९११, पृ. २७२
१२. होळकर दरबारातील हिंगण्यांची वकिली, १९११, पृ. ३८
१३. मुसलमानी अमदानीतील मराठे सरकार, १९२९, पृ. ७८
१४. मराठ्यांचे आरमार, १९०४, पृ. ७०
१५. मराठ्यांचे पराक्रम १८९५, पृ. २७६
१६. सवाई माधवराव पेशव्यांचा दरबार आणि त्यावेळचे पहिले इंग्रज रेसिडेंट सर चार्लस् मॅलेट, पृ. १०६
१७. मुधोळ संस्थानचे घोरपडे जहागीरदार, पृ. १२
१८. झाशी संस्थानच्या महाराणी लक्ष्मीबाईसाहेब यांचे चरित्र, १८९४, पृ. ४१६
१९. महाराणी बायजाबाईसाहेब शिंदे यांचे चरित्र, १९०२, पृ. १५६
२०. महापुरुष ब्रह्मेंद्रस्वामी धाबडशीकर चरित्र व पत्रव्यवहार, १९००, पृ. ४७३

**(ड) इंग्रजी पुस्तके आणि लेख**

१. ए हिस्ट्री ऑफ द मराठा पीपल (सी.ए. किंकेड समवेत) ३ खंड, १९१८-१९२५
२. नोट्स ऑन सातारा
३. महाबळेश्वर

४. सांगली स्टेट
५. पन्हाळा
६. पूना इन बायगॉन डेज

**इंग्रजी लेख**

1. "A Note on Marathi Historical Records and their publication", Proceedings of the Historical Records commission (HRC) Bombay Session, January 1921, Vol. III, P 51-60
2. 'Original correspondence between the English and the Marathas' HRC, Calcutta, 1923, Vol. P.P. 91-99
3. 'A note on the Maratha Records relating to the History of South India,' HRC, Madras, Jan- 1924, Vol. VI, P.P. 57-74
4. A note on the Peshwas Records and their historical value with a few extracts from Chitnis letters HRC, Pune, Jan. 1925, Vol. VII, P.P. 35 - 50
5. 'The Maratha Ambassadors at the Court of Delhi and their correspondence', HRC, Lahore, November, 1925, Vol. VIII, P-159-66
6. 'Maratha Historical Literature' (Read before the History section on 19th January 1905 in connection with the centenary of the Bombay branch of the Royal Asiatic Society. Published JBBRAS, Vol. XXII, Art XIII P. 168-178.)

**संदर्भ :**
मराठ्यांचे इतिहासकार, प्रा. अ. रा. कुलकर्णी,
डायमंड पब्लिकेशन्स, पुणे २००७.
(साभार)

## संपादक परिचय

### डॉ. देवीदास पोटे

- जन्म : डुबेरे, ता. सिन्नर, जि. नाशिक
  ७ मे १९५०
- निवृत्त सहाय्यक विक्रीकर आयुक्त
- संतसाहित्य अभ्यासक, अहिल्याचरित्र आणि इतिहास अभ्यासक, लेखक, कवी, संपादक.
- सदस्य, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.
- ''युगबोध'' आणि ''मुक्त आनंदघन'' या संत साहित्यविषयक दिवाळी विशेषांकांचे संपादन : १९९३ ते आजपर्यंत. या अंकांना विविध मान्यवर संस्थांचे पन्नासहून अधिक पुरस्कार प्राप्त.
- अहिल्याबाई चरित्रविषयक 'महेश्वरच्या घाटावरून' आणि 'युगप्रवर्तक अहिल्याबाई' या ग्रंथांचे लेखन. तसेच होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहास, अ.. अहिल्याबाईंचा, अहिल्यायन, शिवयोगिनी, ती एक अहिल्या होती या ग्रंथांचे संपादन. यापैकी दोन ग्रंथांना महाराष्ट्र शासनाचे उत्कृष्ट ग्रंथ पुरस्कार.
- गंधयात्रा, प्रवासाचे क्षण, शब्द, मन, प्रेम, टिंब टिंब, मांदियाळी, दिंडी चालली आदि कवितासंग्रह प्रकाशित.
- संत साहित्यविषयक भारतीय संत कवयित्री, कैवल्याचे लेणे, चैतन्याचा ज्ञानदीप, कबीर चिंतन, श्रीकृष्ण : एक अभ्यास, महान भारतीय संत, अवघाचि विठ्ठल या ग्रंथांचे संपादन.
- वारी, अद्वितीय युगप्रवर्तक : संत तुकाराम, संतशब्दांचा परिमळु, कबीरायन, अवघाचि राम, अहिल्यानीती हे आगामी ग्रंथ प्रकाशनाधीन.
- अनेक सामाजिक / सांस्कृतिक संस्थांमध्ये विविध पदांची जबाबदारी. साहित्यिक / सांस्कृतिक / सामाजिक कामाबद्दल महाराष्ट्र आणि बृहन्महाराष्ट्रातील विविध मान्यवर संस्थांचे वीसहून अधिक पुरस्कार.
- भ्रमणध्वनी : ९८२०३ ३२१२८, Email : dspote7@gmail.com

'महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें' हा ग्रंथ म्हणजे नाना फडणवीस यांनी पेशव्यांच्या वतीने महेश्वर दरबारात नियुक्त केलेले वकील विठ्ठल शामराज ( इ. स. १७७९ ते १७८४ ) आणि केसो भिकाजी दातार ( इ. स. १७८४ ते १७९६ ) यांनी पाठविलेली बातमीपत्रे. होळकर दरबारचे कामकाज, घडामोडी, भेटीगाठी, बैठका, सैन्याच्या हालचाली, राजकीय निर्णय, सण, उत्सव आदी विविध विषयांबाबतचा अहवाल पेशव्यांना पाठविणे हे त्यांचे काम होते. आधुनिक भाषेत त्यांना रिपोर्ताज वा रिपोर्टस् (Reports) असे म्हणतात.

ही बातमीपत्रे इ. स. १७७९ ते १७९६ या कालावधीतील आहेत. यातील लेखांक अहिल्याबाईंच्या कारकीर्दीतील आहेत. फक्त शेवटचे तीन लेखांक, क्र. २७४, २७५ आणि २७६ हे अहिल्याबाईंच्या कारकीर्दीनंतरचे आहेत. थोर इतिहास संशोधक श्री. दत्तात्रय बळवंत पारसनीस ( इ. स. १८७०-१९२६ ) यांनी ही बातमीपत्रे पहिल्यांदा 'इतिहास संग्रह' या मासिकात सातारा येथून प्रसिद्ध केली.

यातील पत्रव्यवहार, आदेश, अनेक राजकीय घडामोडी, विविध शत्रूंशी झालेली युद्धे, विविध प्रकरणांतील प्रशासकीय निर्णय, लग्नप्रसंगीची पट्टी, जासूदांच्या हालचाली, अहिल्याबाईंचा दानधर्म, विविध लोककल्याणकारी कामे, शिंदे-होळकर, पेशवे-होळकर यांच्या परस्परसंबंधातील संदर्भ अशा अनेक अंगांनी मराठेशाहीच्या आणि होळकरशाहीच्या इतिहासाचा एक पट आपल्या नजरेसमोर येतो. अहिल्याबाईंचे प्रशासनकौशल्य, कणखर नेतृत्व आणि प्रशासनावरील पकड या बाबींचा आपल्याला पुरेपूर प्रत्यय येतो.

इतिहासाचा अभ्यास वा लेखन करताना पत्रव्यवहार, सनदा, रोजकीर्द, आदेश, नाणी, शिक्के याप्रमाणे बातमीपत्रे हा एक महत्त्वाचा दस्तऐवज मानला जातो. म्हणूनच होळकरशाहीच्या आणि विशेषतः अहिल्याबाईंच्या प्रशासनाचा आणि राज्यकारभाराचा अभ्यास करताना या बातमीपत्रातील अनेक संदर्भांचा आपल्याला निश्चितपणे उपयोग होतो. ही बातमीपत्रे ऐतिहासिक दृष्टीने अतिशय महत्त्वपूर्ण आहेत, हे निर्विवाद सत्य आहे.